# अध्यात्मग्रंथमाला


" तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारिये ।
परि लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ "

ज्ञानेश्वरी १८.१७६०


ग्रंथांक ३


# तुकारामवचनामृत


रा. द. रानडे, एम्. ए.



किंमत १॥ रुपया.

## पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें

१ Academy of Philosophy and Religion, Post Deccan Gymkhana, Poona.

२ अध्यात्मविद्यापीठ, पोष्ट निंबाळ, जिल्हा विजापूर.

३ आर्यभूषण प्रेस, पुणें.

४ गणेश प्रिंटिंग वर्क्स, शनिवार पेठ, पुणें.

५ सर्व बुकसेलर्स, पुणें, मुंबई, नागपूर, वगैरे.

हें पुस्तक
रा. **गणेश काशिनाथ गोखले** यांनीं गणेश प्रिंटिंग प्रेस, जमखंडीकर यांचा वाडा (पानें २७+२०५), व रा. **अनंत विनायक पटवर्धन** यांनीं आर्यभूषण छापखाना (प्रस्तावना, पानें १-२५) यांमध्यें पुणें येथें छापिलें, व तें प्रो.
**रामचंद्र दत्तात्रेय रानडे** यांनीं
पुणें येथें प्रसिद्ध केलें.

*

# अध्यात्मग्रंथमाला

१. या ग्रंथमालेचें मुख्य प्रयोजन म्हणजे लोकांस परमार्थाचें उज्ज्वल स्वरूप महाराष्ट्रवाङ्मयांतून उघड करून सांगणें हें होय. ज्ञानेश्वरांपासून रामदासांपर्यंत जे साधु महाराष्ट्रांत निर्माण झाले त्यांनीं अशा प्रकारची उज्ज्वल ग्रंथरचना मराठींत करून ठेविली आहे कीं तिचें वाङ्मयदृष्ट्या व परमार्थदृष्ट्या फारच मोठें महत्त्व आहे. परमार्थाबद्दलच्या निरनिराळ्या भ्रामक कल्पनांचें निरसन करून शुद्ध परमार्थाचें स्वरूप समजावून देणें हें महाराष्ट्रवाङ्मयाचें पवित्र कर्तव्य आहे. हें कार्य महाराष्ट्रवाङ्मयांतून जितक्या उत्कृष्ट रीतीनें सिद्धीस गेलें आहे तितकें हिंदुस्थानच्या इतर प्रांतिक भाषांतून, अगर पाली अगर प्राकृत भाषांतून, अगर खुद्द संस्कृतभाषेंतूनही सिद्धीस गेलें आहे किंवा नाहीं याची शंकाच आहे. नुसतें परमार्थाचें खरें स्वरूप समजून देण्याचें सामर्थ्य महाराष्ट्रवाङ्मयांत आहे इतकेंच नव्हे, तर सर्व धर्मांचें एकीकरण करण्याचें सामर्थ्यही महाराष्ट्रवाङ्मयांत आहे. धर्माधर्मांतील लढे केवळ अज्ञानामुळें उत्पन्न होतात; पण परमार्थाचें शुद्ध स्वरूप कळल्यास ते लढे नाहींसे करण्याचें सामर्थ्य त्यांत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. यामुळें आमच्या महाराष्ट्राच्या धार्मिक वाङ्मयाचा सशास्त्र अभ्यास होणें किती जरूरीचें आहे हें सांगण्याचें कारण नाहीं.

२. आज या अध्यात्मग्रंथमालेंतील पहिलीं चारच पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत. हीं चार पुस्तकें म्हटलीं म्हणजे महाराष्ट्राच्या धार्मिक वाङ्मयाचा संपूर्ण निष्कर्ष होय. पहिल्या पुस्तकांत ज्ञानेश्वरींतील उताऱ्यांची विषयवार रचना करून ज्ञानेश्वरांची सर्वांगीण पारमार्थिक शिकवण कशी होती हें संपूर्ण रीतीनें त्यांच्याच शब्दांत सांगण्याचा प्रयत्न केला आहे. दुसऱ्या पुस्तकांत तीन भाग आहेत.

पहिल्या भागांत निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, व चांगदेव यांनीं जी अभंगरचना केली आहे तिचा संपूर्ण गोषवारा त्यांच्याच शब्दांत दिला आहे. दुसऱ्या भागांत नामदेव व तत्कालीन संतकवि यांच्या निवडक अभंगांची विषयवार रचना करून परमार्थाचें रहस्य त्यांच्या तोंडून सांगितलें आहे. या संतकवींमध्यें ज्यांचे ज्यांचे अभंग उपलब्ध आहेत अशा सर्व संतांचा उल्लेख करण्याचा प्रयत्न केला आहे. गोरा कुंभार, विसोबा खेचर, सांवता माळी, नरहरि सोनार, चोखा-मेळा, जनाबाई, सेनान्हावी, कान्होपात्रा, या सर्व जातींच्या व व्यव-सायांच्या संतांचा उल्लेख येथें केला आहे. तिसऱ्या भागांत भानु-दास, जनार्दनस्वामी, व एकनाथ यांच्या अभंगांची विषयवार निवड करून त्यांच्या तोंडून परमार्थाचें रहस्य सांगितलें आहे. अध्यात्म-ग्रंथमालेच्या तिसऱ्या पुस्तकांत संतशिरोमणि तुकारामांचें अध्यात्म-चरित्र व अध्यात्मोपदेश त्यांच्याच वचनांच्या आधारें सांगितला आहे. शेवटच्या म्हणजे चवथ्या पुस्तकांत रामदासांच्या दासबोध व इतर संकीर्ण ग्रंथांच्या आधारें रामदासांची पारमार्थिक व व्याव-हारिक शिकवण कशी होती हें सांगितलें आहे. यावरून ही गोष्ट उघड होईल कीं, हीं चार पुस्तकें म्हणजे महाराष्ट्रधर्माचा मूलरूपानें संपूर्ण इतिहासच होय. या चारी पुस्तकांस विस्तृत विवेचनात्मक प्रस्तावना जोडल्या असून त्यांमध्यें त्या त्या साधूंचें पारमार्थिक वर्म शक्य तितकें उघड करून सांगण्याचा प्रयत्न केला आहे. यामुळें या चारी पुस्तकांचा अभ्यास केल्यास महाराष्ट्रवाङ्मयामध्यें परमार्थाचें रहस्य निरनिराळ्या संतांनीं कसें सांगितलें आहे हें पूर्णपणें निदर्शनास येईल. ज्ञान, भक्ति, व कर्म यांचा त्रिवेणीसंगम जर कोठें झाला असेल तर तो आमच्या महाराष्ट्रवाङ्मयांतच होय. ज्ञानेश्वरांप्रमाणें ज्ञानी, नामदेवतुकारामांप्रमाणें भक्तिमान्, व रामदासांप्रमाणें कर्मयोगी लोक आमच्या महाराष्ट्रांतच निर्माण झाले.. आजचा आपला प्रसंग

ज्ञान, भक्ति, व कर्म यांचा समुच्चय करण्याचा आहे. यामुळेंही या ग्रंथमालेच्या अभ्यासाचें किती महत्त्व आहे हें सांगावयास नको.

३. आजकाल आपल्या विश्वविद्यालयांतून महाराष्ट्रभाषेचें अध्ययन जारीनें सुरू होत आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे. जें स्थान इंग्रजी भाषेमध्यें चॉसर्, शेक्सपियर्, मिल्टन्, वर्ड्सवर्थ् इत्यादिकांनीं पटकावलें आहे, तेंच स्थान वाङ्मयदृष्टीनें ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, व रामदास यांनीं महाराष्ट्रभाषेंत पटकावलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. बायबलचा ज्याप्रमाणें वाङ्मयाच्या दृष्टीनें अभ्यास होतो, त्याप्रमाणेंच आमच्या साधूंच्या ग्रंथांचा वाङ्मयाच्या दृष्टीनेंही अभ्यास व्हावयास पाहिजे. रवींद्रनाथ टागोर यांचा गीतांजलि हा ग्रंथ उत्कृष्ट आहे यांत शंका नाहीं; परंतु तुकारामज्ञानेश्वरांचें अध्ययन केलें असतां त्यांचे ग्रंथ तितकेच किंवा त्याहूनही सरस आहेत हें वाचकांच्या ध्यानांत येईल. किंबहुना, तुकारामज्ञानेश्वरादिकांच्या अगर तत्सदृश साधूंच्या वचनांचा फैलाव जो हिंदुस्थानांत झाला त्याचें गीतांजलि हें एक आधुनिक निदर्शन आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या कारणास्तव महाराष्ट्रवाङ्मयाच्या व महाराष्ट्रधर्माच्या आधारभूत असलेल्या या ग्रंथांचा अभ्यास आमच्या विश्वविद्यालयांतून अवश्य व्हावयास पाहिजे. चमत्कारांच्या दृष्टीनें या साधूंच्या चरित्रांकडे न पाहतां त्यांच्या ग्रंथोक्तींच्या दृष्टीनें त्यांजकडे पहावयास आपण शिकलें पाहिजे; व अशा रीतीनें त्यांजकडे पाहिलें असतां बुद्धिवादास पटेल अशाच प्रकारचा अनुभव ( Rational Mysticism ) त्यांच्या ग्रंथांत सांगितला आहे असें दिसून येईल.

४. "अध्यात्मविद्यापीठ" (Academy of Philosophy and Religion ) या संस्थेतर्फे हिंदी तत्त्वज्ञानाचा इतिहास जो सोळा भागांत लिहिण्यांत यावयाचा आहे, त्यांतील पंधराव्या भागांत हीं

आजचीं चारही पुस्तकें अंतर्भूत होतात. या चार मूळ पुस्तकांवर विवरणात्मक "Mysticism in Maharashtra" या नांवाचा ग्रंथ हा त्या हिंदीतत्त्वज्ञानाच्या इतिहासांतील दहावा भाग होय; व तो लौकरच छापून बाहेरही निघेल. या ग्रंथाचें अध्ययन व वाचन विशेषतः युरोपांत अधिक होणार. त्यांत जीं प्रमेयें केलीं आहेत त्यांस आधारभूत अगर उपकरणभूत म्हणून हे आजचे चार ग्रंथ प्रकाशित होत आहेत, ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. या कारणामुळेंच या चार पुस्तकांतील कांहीं पुस्तकांच्या शेवटीं इंग्रजी हेडिंगें घातलीं आहेत, त्यांचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे पाश्चात्य लोकांनीं आमच्या महाराष्ट्रभाषेचा अभ्यास करून त्यांतील चिद्रत्नें ओळखण्यास शिकलें पाहिजे हा होय.

५ या अध्यात्मग्रंथमालेंतील पुढील पुस्तकें जसजशीं तयार होतील तसतशीं तीं प्रसिद्ध करण्यांत येतील. आज त्यांचा नामनिर्देश करण्याचें कारण नाहीं. तूर्त आजचे चारच ग्रंथ प्रकाशित होत आहेत. पुढें मागें जुळून आल्यास, पाश्चात्य व पौर्वात्य तत्त्वज्ञांचे व सत्पुरुषांचे विचार व अनुभव जमेस धरून, शास्त्रीय दृष्टीचा निकष लावून, स्वानुभवास पडताळून, चिकित्सक बुद्धीनें आधुनिक लोकांस परमार्थाच्या दृष्टीनें उपयोगी पडेल अशा प्रकारचा एक ग्रंथ लिहिण्याची जरूरी आहे; त्यास हे आजचे चारही ग्रंथ उपयोगी पडतील असा भरंवसा आहे.

रा. द. रानडे.

---

# तुकारामवचनामृत.



## प्रस्तावना.



### ऐतिहासिक.

१. श्री तुकाराममहाराजांच्या चरित्रासंबंधानें ऐतिहासिक दृष्ट्या तीनच प्रश्न फार महत्त्वाचे आहेत : ( १ ) तुकाराम महाराजांचा जन्म केव्हां झाला, ( २ ) त्यांस गुरूपदेश केव्हां मिळाला, आणि ( ३ ) त्यांचें निर्याण केव्हां झालें ? या संतशिरोमणि साधूच्या चरित्रासंबंधीं या तीन्हीं गोष्टींबद्दल अद्याप विद्वानांमध्यें मतभेद आहे ही मोठया खेदाची गोष्ट होय. तुकाराममहाराजांच्या जन्मासंबंधीं तीन निरनिराळीं मतें प्रचलित आहेत: ( १ ) रा. राजवाडे यांनीं वांईकडील एका वारकऱ्याच्या घरांतील तुकारामांच्या वंशावळीवरून तुकाराम महाराजांचा जन्म शके १४९० सालीं झाला असें ठरविलें आहे; ( २ ) रा. भारदे यांनीं देहू व पंढरपूर येथील तुकारामांच्या वंशावळीनुरूप तुकारामांचा जन्मकाल शके १५२० हा धरला आहे; ( ३ ) रा. पांगारकर यांनी महिपतीच्या वचनांच्या आधारें तुकारामांचें वय शके १५५१ च्या दुष्काळांत निम्में म्हणजे एकवीस वर्षांचें होतें असें धरून तुकारामांचा जन्मकाल शके १५३० असा ठरविला आहे. रा. राजवाडे यांचें मत खरें मानल्यास, तुकारामांनीं ज्यावेळीं देह ठेविला त्यावेळीं, म्हणजे त्यांच्या ८२ व्या वर्षी, त्यांची बायको गरोदर होती ही गोष्ट असंभवनीय दिसते. रा. भारदे यांनीं ज्या वंशावळींवर विश्वास टाकला आहे त्या फारशा जुन्या आहेत असें दिसत नाहीं; तथापि त्या देहू व पंढरपूर येथील आहेत ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. रा. पांगारकर यांच्या म्हणण्यास शके १५५१ मध्यें तुकारामांचें वय एकवीस

वर्षांचें असावें हें अनुमानच सबळ पुरावा आहे. तथापि शके १५२० अगर १५३० हीं दोनच सालें तुकारामांच्या जन्मासंबंधीं विचारणीय आहेत यांत शंका नाहीं. तुकाराम महाराजांच्या गुरूपदेशाचा शक कोणता याबद्दलही दोन निरनिराळीं मतें प्रसिद्ध आहेत. तुकारामांनीं आपल्या एका अभंगांत ( क्रमांक १ ) माघ शुद्ध १० गुरुवारीं स्वप्नांत आपल्यास गुरूपदेश झाला असें लिहिलें आहे. आतां माघ शुद्ध १० गुरुवार शके १५४१ मध्येंही येतो, व शके १५५४ मध्येंही येतो. भारदे यांच्या मताप्रमाणें तुकारामांचा जन्म शके १५२० सालीं झाला असं मानल्यास शके १५४१ मध्यें माघ शुद्ध १० स तुकारामांस गुरूपदेश झाला हें म्हणणें योग्य ठरतें; व रा. पांगारकर यांच्या मताप्रमाणें तुकारामांचा जन्म शके १५३० सालीं झाला असें मानल्यास शके १५५४ मध्यें त्यांस गुरूपदेश झाला असावा असें मानण्यास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें तुकारामांचा जन्म व गुरूपदेश यांच्या तारखा भानगडीच्या आहेत, त्याप्रमाणेंच त्यांच्या निर्याणाच्या तारखेसंबंधींही थोडीबहुत भानगड आहे; पण ही भानगड पूर्वींच्या भानगडींइतकी मोठी नाहीं. प्रश्न इतकाच आहे, कीं तुकारामांचें निर्याण शके १५७१ सालीं झालें असें समजावें, कां शके १५७२ सालीं झालें असें समजावें ? संताजी जगनाडे यांचा मुलगा बाळाजी यानें आपल्या तुकाराम महाराजांच्या अभंगाच्या वहीत स्वदस्तुरनें " सके १५७२ वीकृती नाम संवछर फळगुन वदी २ द्वीतीया वार सोमवार " रोजीं तुकाराम महाराजांचें निर्याण झालें असें लिहिलें आहे. देहू येथें पूजेंतील तुकारामांच्या अभंगाची जी वही आहे तींत " सके १५७१ वीरोधीनां सवछरे शीमगा वद्य द्वितीयाः वार सोमवार " रोजीं तुकारामांचें निर्याण झालें असें लिहिलें आहे. कोणत्याही एका गोष्टीचा काल ठरवितांना तीथ, वार, पक्ष, महिना, शक, इत्यादिकांचा बरोबर जम बसणें हें किती कठीण आहे हें आमच्या इतिहासज्ञ वाचकांस सांगणें नकोच. रा. पांगारकर यांच्या मताप्रमाणें शके १५७१ फाल्गुन वद्य द्वितीया शनिवार रोजीं तुकाराम वैकुंठास गेले, व रा. वि. ल. भावे यांच्या मताप्रमाणें ( गत ) १५७२ विकृतसंवत्सर फाल्गुन वद्य द्वितीया सोमवारीं तुकारामानीं प्रयाण केलें असें होतें. या एकंदर हकीकतीवरून पाहतां भक्तशिरोमणि तुकाराम महाराजांच्या चरित्रासंबंधानें ऐतिहासिक पुरावा जितका सबळ पाहिजे तितका उपलब्ध नाहीं याबद्दल फार वाईट वाटतें.

# तुकारामांचें आत्मचरित्र.

२. ऐतिहासिक पुराव्यासंबंधानें अशी जरी स्थिति आहे तथापि तुकाराम महाराजांच्या चरित्रांतील गोष्टींसंबंधीं मात्र खात्रीची व विश्वासनीय माहिती उपलब्ध आहे. ही माहिती म्हणजे खुद्द तुकाराम महाराजांच्या अभंगांतूनच मिळालेली आहे. तुकारामांचे अभंग म्हणजे तुकारामांचें एक व्यावहारिक व पारमार्थिक आत्मचरित्रच होय. प्रथम आपल्यास येथें त्यांच्या व्यावहारिक म्हणजे बाह्यचरित्राबद्दलच चर्चा करावयाची आहे. त्यांच्या परमार्थिक म्हणजे अंतश्चरित्रासंबंधीं थोडक्यांतच पुढें बोलूं. तुकाराममहाराज कुणबी जन्मल्याबद्दल आनंद मानतात (क्र. ३), व आनुवंशिक संस्कारामुळें पंढरीची वारी करण्याचें भाग्य मला प्राप्त झालें आहे असें ते लिहितात (क्र. ४). त्यांस जरी महाजनकीचें वतन होतें तथापि दुष्काळांत तें सगळें आटलें जाऊन त्यांची पहिली स्त्री रखुमाबाई व मुलगा हीं दुष्काळांत अन्न अन्न करितां मेलीं, व देवानें त्यांस मायाविरहित केलें (क्र. ९). ज्या सालीं हा दुष्काळ पडला तें साल रा. पांगारकर यांनीं आपल्या नेहमींच्या शोधक बुद्धीस अनुसरून गॅझेटियरवरून व इतर साधनांवरून शके १५५१—१५५२ असें ठरविलें आहे. तुकारामांचे वडील व मातोश्री हीं तत्पूर्वीच निवर्तलीं होतीं. दुष्काळांतच तुकारामांचीं गुरेंढोरें मरून दिवाळेंही निघालें, व यामुळें जगांत अपमान झाल्यानें तुकारामांस संसार वमनप्राय वाटावयास लागला (क्र. ६). त्यांची दुसरी बायको जिजाबाई ही फार कर्कशा असल्यानें जनांमध्यें त्यांची फार दुर्दशा व्हावयास लागली (क्र. ६). 'जो उठतो तो टाळ कुटतो, यांच्या नांवानें यांचीं बायकापोरें रडत आहेत' असें तुकारामांची बायको त्यांच्याबद्दल व त्यांच्या संतांबद्दल बोलूं लागली (क्र. ८). अशा वेळीं जे चार पैसे तुकारामांच्या गांठीं होते ते खर्चून तुकारामांनीं एक लहानसें देऊळ बांधलें (क्र. ६); पण तेंही भंगून गेलें असावें असें दिसतें (क्र. २९). गांवांतील लोक व पाटील यांनीं तर न्यायाच्या कचेरीपुढेंच तुकारामांस खेचलें (क्र. ५). अशा स्थितींतून बाहेर पडण्याचा मार्ग म्हणजे हरिभजनावांचून नाहीं असा संकल्प करून तुकाराम प्रथम एकादशी व कीर्तन करावयास लागले. तथापि त्यांचें अभ्यासाकडे असावें तसें लक्ष नव्हतें. विश्वासानें व आदरानें ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, इत्यादि संतांचीं वचनें पाठ करून ते प्रथम ध्रुपद धरावयास लागले, व नंतर कीर्तन

करावयास लागले ( क्र. २९ ). आपल्या इष्टमित्रांचें वचन तुकारामांनीं मानिलें नाहीं; त्यांनीं बहुमतास धाब्यावर बसविलें ( क्र. २९ ); व भामनाथ, भंडारा, इत्यादि डोंगरांच्या एकांतांत शिरून ते भजन करावयास लागले ( क्र. २८ ). अशाच वेळीं त्यांस गुरूंचा उपदेश झाला. माघ शुद्ध १० गुरुवारीं स्वप्नांत त्यांस दृष्टांत होऊन त्यांच्या गुरूंनीं आपली परंपरा राघवचैतन्य, केशवचैतन्य, यांपासून आली आहे असें सांगून आपलें नांव बाबाजी असें सांगितलें, व तुकारामांस "रामकृष्णहरि" हा मंत्र दिला ( क्र. १ ). हा मंत्र सोपा व तुकारामांच्या आवडीचा असल्यानें संसारसागर तरण्यास ही एक नौकाच आहे असें त्यांस वाटलें ( क्र. २ ). तुकारामांची शिष्यीण बहिणाबाई हिनें राघवचैतन्य हे ज्ञानदेवांचे शिष्य जे सच्चिदानंदबाबा त्यांचे शिष्य होत असें लिहिलें आहे. यावरून पाहतां तुकारामाची परंपरा एकाप्रकारें ज्ञानदेवांपासूनच आली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कांहींच्या मतें बाबाजी चैतन्य हेच केशवचैतन्य असून कांहींच्या मतें हे दोघे भिन्न आहेत. तुकारामांनीं आपले गुरु बाबाजी यांचा उल्लेख आणखी दोन तीन ठिकाणीं केला असून एके ठिकाणीं आपल्यास " बाबाजीसद्‌गुरुदास " असें म्हटलें आहे ( क्र. २७ ), व दुसरे ठिकाणीं आपल्यास गुरूचें स्थूलदर्शन झालें नाहीं तरी हरकत नाहीं, त्यांच्या कृपेनें मिळालेलें सूक्ष्मदर्शन हें स्थूलदर्शनाइतकेंच महत्त्वाचें आहे असें त्यांनीं म्हटलें आहे:—

ज्योतिचा प्रकाश पाहेन तुझे पाय । स्थुळामाजि काय आहे माझे ॥
सूक्ष्मांश जरि कारण ते आशे । निळबिंदु वशे शामवर्ण ॥
मसुरे प्रमाण मोतियाचे परी । आहे दशवे द्वारीं निजरूप ॥
डोळिया न दिसे हातानें धरवेना । हेचि खूण जाणा संतामाजि ॥
तुका म्हणे माझें तोडिलें बंधन । सद्‌गुरु निधान बाबाजीनें ॥

३. याच सुमाराम तुकारामांस नामदेवांचें स्वप्नामध्यें दर्शन होऊन नामदेवांनीं त्यांस आपली शतकोटि अभंगांची प्रतिज्ञा पुरी करण्यास सांगितलें असें तुकारामांनीं लिहिलें आहे ( क्र. ११ ). नामदेवांबरोबर विठ्ठलाचेंहि स्वप्नदर्शन झाल्याचें तुकाराम सांगतात ( क्र. १२ ). आपण जी अभंगरचना केली ती आपली नसून देवाच्या कृपेचीच आहे, या अभंगांचें प्रयोजन काय हें मला समजत नाहीं, माझ्या हातून होईल तितकी बडबड मीं केली आहे असें तुकाराम सांगतात (क्र. १३). तुकारामांचें प्रसादपूर्ण व भक्तिरसपारिप्लुत कवित्व रामेश्वरभट या नांवाचा एक दशग्रंथी

ब्राह्मण होता त्याच्यानें पाहवेना. म्हणून त्याचें समाधान करण्याकरितां तुकारामांनीं आपलें कवित्व नदींत बुडविलें व तेरा दिवस निश्चक्र उपवास केला ( क्र. १५ ). अशा वेळीं आपल्यास बालवेशानें देवाचें दर्शन झाल्याचें तुकारामांनीं लिहिलें आहे ( क्र. १६ ). तुकारामांचा द्वेष केल्यामुळें रामेश्वरभट्टाच्या शरीरांत फार व्यथा उत्पन्न झाली; व ज्ञानेश्वरांच्या स्वप्नांतील अनुज्ञेप्रमाणें तुकारामांस शरण गेल्यावरच त्याची ती व्यथा कमी झाली ( क्र. २५ ). जो परमार्थाचें वर्म समजण्यापूर्वीं तुकारामांची निंदा करीत असे, त्यानेंच परमार्थप्राप्तीनंतर भक्तिज्ञानवैराग्यानें तुकारामांइतका श्रेष्ठ पुरुष आपण पाहिलाच नाहीं अशी ग्वाही दिली आहे (क्र. २६). एकदां आपले प्रियशिष्य शिवबा कासार यांचे घरीं लोहगांवास तुकाराम कीर्तनास गेले असतां शिवबांच्या बायकोनें त्यांच्या अंगावर आधणाचें पाणी ओतलें. त्यामुळें जणूं कांहीं शरीरास वणवाच लागल्याप्रमाणें तुकारामांस व्यथा झाली ( क्र. २३ ); तथापि ईश्वराची करुणा भाकिल्यामुळें तो दाह शांत झाला, असें तुकाराम सांगतात (क्र. २४). शिवाजी महाराजांनीं एकदां जडजवाहीर देऊन आपल्या एका कारकुनास तुकारामांकडे पाठविलें असतां 'मुंगी आणि राव, सोनें व माती, आम्हांस सारखींच आहेत' असें त्यांनीं त्यास उत्तर दिलें (क्र. ३४). तुकारामांच्या देहावसानाचे अगोदरच कांहीं वर्षे शिवाजीनें तोरणा किल्ला घेतला होता; तसेंच शिवाजीचें पुण्यास नेहमीं जाणें येणें असे; यावरून तुकारामांची व शिवाजीची भेट खात्रीनें झाली असावी असें दिसतें. शिवाजी एकदां तुकारामांच्या कीर्तनास बसला असतां अकस्मात् मुसलमानांचा हल्ला आलेला पाहून "मी आपल्या मरणाला भीत नाहीं; या जनांस दुःख झालें असतां मात्र मला तें पाहवणार नाहीं" ( क्र. ३२ ), अशी तुकारामांनीं देवाची प्रार्थना केली. कर्मधर्मसंयोगानें कांहीं कारणानें एकदम मुसलमानांचा वेढा उठला, व इकडे तुकाराम व शिवाजी यांची सुटका झाली; व हरिदासांच्या वाऱ्यासही परचक्र राहणार नाहीं ( क्र. ३१ ) अशी त्यांची खात्री पटली. तुकाराम महाराजांचे " पाइकीचे अभंग " म्हणून जे प्रसिद्ध आहेत ते शिवाजीसच अनुलक्षून लिहिले असावेत असें जें रा. पांगारकर यांनीं लिहिलें आहे तें यथार्थ दिसतें. परमार्थ अगर प्रपंच बहादुरी केल्याखेरीज होत नाहीं असा या अभंगांचा सारांश आहे. तुकारामांनीं शिवाजीस " सद्गुरु श्रीरामदासांचें भूषण । तेथें घाली मन चळों नको " असा उपदेश केल्याबद्दलचाही एक अभंग आहे. हा अभंग तुकारामांचाच आहे किंवा नाहीं याबद्दल थोडी शंका आहे.

तथापि रामदास शके १५६६ मध्यें कृष्णातीरीं आले; शके १५७१ च्या आषाढमासीं ते पंढरपुरास विठ्ठलदर्शनास गेले होते; व शके १५७२ सालीं तुकारामांनीं देह ठेविला; या गोष्टी लक्षांत घेतल्यावर रामदासांची व तुकारामांची भेट झालीच नव्हती असें म्हणतां येणार नाहीं. निदान, रामदासांचें नांव तरी तुकारामांनीं ऐकलें असलें पाहिजे, व शिवाजीचा ओढा रामदासांच्याकडे आहे असें समजून त्यास तदनुरूप उपदेश केला असला पाहिजे. असो. तुकाराम आपल्या स्वतःच्या कबुलीजबाबाप्रमाणें पंढरीसांप्रदायाचे कळस बनले होते ही गोष्ट सिद्ध आहे. एका वारीस ते आजारी असल्यानें त्यांच्यानें पंढरीस जाववेना. त्यावेळीं त्यांनीं जें हृदयस्पर्शी अभंगरूप पत्र लिहिलें आहे तें फारच वाचनीय आहे. आणखी एका प्रसंगीं एका ब्राह्मणास ज्ञानेश्वरांचा दृष्टांत झाल्यामुळें तो तुकारामांकडे आला. त्यावेळीं "देवापाशीं मोक्षाचें गांठोडें नाहीं; आपण इंद्रियांचा जय करून, देहभावास ओस पाडून, देवास आळविलें असतां, त्याची प्राप्ति होईल; ज्यास गोविंदाचें ध्यान लागलें त्याची कायाही गोविंदरूपच होते; आपण अल्पमात्र आहों असें समजून संकोच पावूं नकोस; या सर्व ब्रह्मांडाचें आपोशन घे," असा तुकारामांनीं त्या ब्राह्मणास उपदेश केला ( क्र. ३५-३९ ); व ज्ञानेश्वरांबद्दल आपण त्यांच्या पायाची वहाण आहों असें सांगून आपली अनुपम नम्रता प्रकट केली, आणि जे चार शब्द मी वेडेवांकुडे बोललों असेन त्याबद्दल ज्ञानेश्वरांनीं आपल्यास क्षमा करावी असें ज्ञानेश्वरांजवळ मागणें मागितलें ( क्र. ४०–४१). तुकारामांच्या देहावसानाचा समय आला तेव्हां गरुडासमवेत देवाचें मला दर्शन होत आहे, व ते मला वैकुंठाप्रत बोलावीत आहेत, असें सांगून तुकारामांनीं देह ठेविला ( क्र. ४२--४३ ). ज्यानें गोविंदाचें ध्यान केलें त्याची "कायाही गोविंदरूप" च होते या तुकारामांच्या उक्तीप्रमाणें, अगर "सदेह सच्चिदानंद। कां नोहावे ते" ( १८. १६४५ ) या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणें तुकाराम सदेह वैकुंठास गेले असें म्हणण्याचा परिपाठ पडला असावा.

४. येथपर्यंत तुकारामांच्या चरित्रांतील बाह्य प्रसंग आपण त्यांच्या अभंगांच्या आधारें जितके आपल्यास पाहतां येतील तितके पाहिले. आतां आपण त्यांच्या अंतश्चरित्राकडे वळूं. याबद्दलची माहिती तुकारामांच्या अभंगांत इतकी भरपूर आहे कीं त्याबद्दल इतर पुराव्याचा विचार करण्याचें कारण नाहीं. परमार्थास प्रारंभ केल्यावर तुकारामांच्या मनाची स्थिति साधकदशेंत कशी होती, साधन

करितां करितां शेवटची पायरी लौकर गांठतां येईना म्हणून त्यांच्या अंतःकरणांत भयंकर तळमळ कशी उत्पन्न होऊन राहिली, ईश्वरकृपेनें त्यांस परमार्थसाक्षात्कार शेवटीं कसा झाला, व एकदां सिद्धावस्थेवर आरूढ झाल्यावर त्यांनीं जनास उपदेश कसा केला, याबद्दलचा भरपूर पुरावा त्यांच्या अभंगांत सांपडण्यासारखा आहे. तुकारामांच्या अभंगांचें Psychology of Mysticism च्या दृष्टीनें अद्याप फारसें अध्ययन कोणी केलेलें नाहीं. ईश्वरसाक्षात्काराच्या मार्गात मनांत ज्या अनंत वृत्ति उठतात व जे अनंत अनुभव येतात त्यांचें निरीक्षण करून ईश्वरप्राप्तीचा हा अंतर्मार्ग काय आहे याबद्दल तुकारामांच्या चरित्रापासून आपल्यास पुष्कळ बोध घेतां येण्याजोगा आहे. अशा प्रकारचे ग्रंथ इंग्रजी भाषेंत व इतर युरोपियन भाषेंत पुष्कळ झालेले आहेत. आपल्या महाराष्ट्रभाषेंत मात्र अशा प्रकारचे ग्रंथ अद्याप झाले नाहींत. तुकारामांचें अंतश्चरित्र लिहावयाचें म्हटलें म्हणजे त्याबद्दल एक स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल. या प्रस्तावनेंत ही गोष्ट करितां येणें शक्य नाहीं. म्हणून अगदीं थोडक्यांत तुकारामांच्या या अंतश्चरित्राचा परामर्ष आपण येथें घेऊं. तुकारामांनीं ज्यावेळीं आपल्या साधकदशेस प्रारंभ केला त्यावेळीं त्यांनीं प्रथम आळसाला व लज्जेला रामराम ठोकला ( क्र. ४४ ), व एकांतांत जाऊन एकाच आसनावर बसून योगिराजाप्रमाणें त्यांनीं साधन आरंभिलें ( क्र. ४५ ). एकदम लौकिकाबाहेर जाऊन त्यांनीं भेटीसरसें लोकांस नमन केलें ( क्र. ४६ ). शरीरास विपत्ति होवोत अगर विटंबना होवो, त्यांची त्यांनीं परवा बाळगली नाहीं ( क्र. ४८ ). अशा स्थितींतच, मृत्यूची भेट जवळ आली असतां, अगर एकमेकांचीं दुःखें पहात असतां, परमार्थास प्रवृत्त होणें हें एकच शहाणपणाचें लक्षण आहे असा त्यांनीं मनाचा निश्चय केला ( क्र. ५१ ). काळाची उडी पडली असतां देशाचा राजा आपल्यास मृत्युभयापासून सोडविणार नाहीं ( क्र. ५५ ). या इहलोकींच्या देहाच्या साधनानें सच्चिदानंद पदवी प्राप्त करून घेतां येते; या कारणानें देहाचें सार्थक केलें पाहिजे असें त्यांनीं ठरविलें ( क्र. ५८ ). जेथें जेथें देव जाईल, तेथें तेथें त्यानें मलाच पहावें असा तुकारामांनीं आपला भाव विस्तृत केला ( क्र. ६१ ). " माझिये जातीचे मज भेटो कोणी " या न्यायानें संतसंगतीचा त्यांस अखंड ध्यास लागून राहिला ( क्र. ६४ ). संतांच्या पायींच्या मोचे, वहाणा, अगर त्यांच्याजवळचें मांजर, सुणा, झालों तरी चालेल; पण संतांची

मला अखंड संगति लाभो अशी त्यांनीं इच्छा बाळगिली ( क्र. ६६ ). व अशा रीतीनें मागच्या भयानें जागृत होऊन तुकारामांनीं आपली साधकदशा आरंभिली ( क्र. ६८ ).

५. साधकदशेच्या मार्गांत विघ्नें भयंकर आहेत ही गोष्ट प्रत्येक साधकाच्या अनुभवाचीच आहे. नानाप्रकारचे विकल्प, नानाप्रकारचे बिकट प्रसंग, नानाप्रकारच्या शंका, साधकाच्या मनांत उद्भवतात, व मृगजळाप्रमाणें साध्य लांबच आहे असें वाटून क्षणोक्षणीं त्याची निराशा होत असते. ही निराशेची स्थिति म्हटली म्हणजे आत्मरूपी सूर्योदयापूर्वीची भिन्न काळोखी रात्र होय. या स्थितींत जागृत राहून जो सूर्योदयाची पहांट पाहतो त्यासच आपलें अंतिम साध्य गांठतां येतें. तथापि या स्थितींत असतांना मात्र मनाची भयंकर तळमळ चालू असते हें तुकारामांच्या अनुभवावरून कळून येईल. तुकारामांमध्यें साधकाचा खरेपणा असल्यानें देवाची भेट त्यांस झाली नाहीं असें त्यांचें मनच त्यांस साक्ष देत होतें ( क्र. ६९). जातीचें मी कुडें वाणीं असल्यानें देवास मला फसवितां येणार नाहीं अशी त्यांची खात्री होती ( क्र. ७० ). स्वप्नांतही कसें देवाचें दर्शन होत नाहीं (क्र. ७१), अगर जागृतावस्थेंत देवाचा आभासही कसा होत नाहीं ( क्र. ७२ ), याबद्दल त्यांस आश्चर्य वाटत होतें. देवाचें सप्तही पाताळांखालचें व सप्तही स्वर्गावरचें अवाढव्य रूप जरी मला दिसलें नाहीं ( क्र. ७४ ), तथापि उद्धवअक्रूरांस, रुक्मांगदप्रल्हादांस ( क्र. ७५ ) जें सानरूप त्यानें दाखविलें, तें मला त्यानें दाखवावें अशी त्यांनीं देवाची प्रार्थना चालविली. देवाचें दर्शन झाल्यास त्याचें स्पर्शन व संभाषणही होईल अशी त्यांनीं आशा बाळगली ( क्र. ७६ ). जो जो भेटेल त्यास देवाची प्राप्ति मला होईल काय असें विचारण्याचा त्यांनीं सपाटा चालविला (क्र. ८२). मी इंद्रियाधीन झालों असल्यानें (क्र. ८७) माझें मन निश्चळ रहात नाहीं ( क्र.८६ ), याबद्दल त्यांनीं देवाची काकुळती भाकिली. पूर्वीच्याप्रमाणेंही भाव माझ्या अंतःकरणांत राहिला नाहीं ( क्र. ८९ ), व मी जणूं कांहीं बहुरूप्याचें सोंगच घेतलें आहे ( क्र. ९१ ), असें त्यांस वाटावयास लागलें. कायावाचामनानें मी अघटित कृत्यें केलीं आहेत; निंदा, द्वेष, विश्वासघात, लक्ष्मीमद, पितृवचनाची अवज्ञा, इत्यादि नाना दोष आपल्यास घडले असें वाटून त्यांचें मन त्यांस खाऊं लागलें ( क्र. ९२ ). देवास आपला देहभाव समर्पिला असतांही पुनः आपल्यास दोषाचें दर्शन कां व्हावें याबद्दल त्यांस वाईट वाटूं लागलें (क्र. ९६). देव आपला अंगिकार

करील कीं नाहीं याबद्दल त्यास शंका वाटावयास लागली ( क्र. ९९ ). आपण यातिहीन असून वर संतांनीं स्तुति केल्याकारणानें पोटांत शूळ उठलेल्या मनुष्यास वर चंदनानें लिंपावें, अगर ताप आलेल्या मनुष्यापुढें मिष्टान्नें वाढावीं, अगर मढ्यास वरून वरून शृंगारावें, त्याप्रमाणें तुकारामांची स्थिति झाली ( क्र. १०३--१०४ ). लोकांनीं वाळींत टाकलें तर एकांत तरी मिळेल असें त्यांस वाटावयास लागलें ( क्र. १०७ ). आपल्या गांवींचें कोणी न भेटल्यामुळें आपली भाषा कोणाशीं बोलावी असें त्यांस होऊन गेलें ( क्र. १०८ ). शिष्टांचे अनुभव ऐकल्याबरोबर तर त्यांच्या मनास तळमळ सुटली ( क्र. ११०. ) पांडुरंगास आपली आठवण देण्याबद्दल त्यांनीं संतांची याचना चालविली ( क्र. ११५ ). मी तुझे दारींचा कुतरा आहें; तूं मला मोकलून देऊं नकोस, असें त्यांनीं देवांस विनविलें ( क्र. ११६ ). आपल्या बळानें आपल्यास बाहेर येतां येत नसल्यानें ईश्वरास 'राख' म्हणून त्यांनीं प्रार्थना चालविली ( क्र. ११७ ). तृषाक्रांत मनुष्यावर जसा जलाचा वर्षाव व्हावा ( क्र. १२० ), अगर उपवासी मनुष्यापुढें ज्याप्रमाणें मिष्टान्नें वाढून यावीं ( क्र. १२१ ), त्याप्रमाणें देवाच्या कृपेची त्यांनीं वांच्छा केली. मी बाहेर जसें बोलतों तसाच माझा आंतील भाव असल्यास तूं मजवर कृपा कर, असें त्यांनीं देवास विनविलें ( क्र. १२३ ). इतकें झालें तरी देवाचें चित्त द्रवेना; त्यामुळें तुझी व माझी आतां फारकत होईल असें चिन्ह दिसावयास लागलें आहे, असें ते देवास म्हणाले ( क्र. १२४ ). तुला भक्त फार असल्यानें मजसारख्या हीन मनुष्यावर तूं कृपा कशास करशील असे उपरोधिक शब्द ते देवास बोलूं लागले ( क्र. १२५ ). खापरावर घातलेल्या लाहीप्रमाणें माझें चित्त तडफडत आहे, असें त्यांनीं देवास विनविलें ( क्र. १२६ ). इतकें असूनही देवास करुणा येईना. तेव्हां देवामध्येंही सामर्थ्य नाहीं, व देवाच्या भक्तीमध्येंही सामर्थ्य नाहीं, असें त्यांस वाटावयास लागलें ( क्र. १२९ ). निराकार देवास आम्हीं आकार देतों हा आमचा उपकार देव विसरला असें ते म्हणावयास लागले ( क्र. १३० ). शेवटीं देवावर त्यांनीं शिव्यांचा वर्षाव सुरू केला. " गाढव कुतरा ऐसा मज ठावा। बैल तूं देवा भारवाही " असें ते म्हणूं लागले. माझ्या भांडखोर तोंडास खवळविल्यामुळें तुझी मी आतां अब्रू घेईन असें ते देवास बोलूं लागले ( क्र. १३२ ). तूं हा लटकाच पसारा मांडला आहेस ( क्र. १३३ ); तूं स्वतः भिकारी असून, आपल्या दासांसही भिकारी करितोस ( क्र.

१३४ ); तुझा दास म्हणविण्याची आतां मला लाज वाटते ( क. १३७ ); अशा देवाविषयींच्या भावना तुकारामांच्या मनांत उत्पन्न व्हावयास लागल्या. इतका हृदयस्थ असूनही तुला माझी करुणा कशी येत नाहीं; तूं आपल्या निर्गुण नांवाप्रमाणेंच निष्ठुर आहेस ( क. १३९ ); तूं आपलें धन जतन करून कोणास देणार ( क. १४० ) ? असा ते देवाबरोबर वाद घालूं लागले. तुझें नाम न घेतां तुझें कुळ मी आतां बुडवीन ( क. १४१ ) अशी त्यांनीं देवास धमकीही दिली. शेवटीं देवाचें दर्शन होईना, तेव्हां माझ्या मतें देव मेला आहे ( क. १४३ ), ज्याला असेल त्याला असो ( क. १४४ ), असें ते उच्चरवानें प्रतिपादूं लागले. आतां आपला देह करवतावर घालून कापूं, अगर अग्नीवर घालून जाळूं, असें त्यांस होऊन गेलें ( क. १४५ ); व शेवटीं देव प्राप्त होईना म्हणून ते आत्मघात करण्यासही प्रवृत्त झाले ( क. १४६ ).

६. अशा स्थितींत तुकारामांस देवाचें एकदम दर्शन झालें. " देह पडो कां देव जोडो " या भावनेनें जो देवाच्या प्राप्तीचा यत्न करितो त्याचा देव अंत पहात नाहीं. " सर्व अर्पावें शेवटीं । प्राण तोही वेंचावा " अशी उदार भावना धरल्यावर देवाचें दर्शन होण्यास वेळ लागत नाहीं. अशाच रीतीनें तुकारामांस देवाचें श्रीमुख दिसलें ( क. १४७ ). देवाचें श्रीमुख दिसल्यावर ब्रह्मींची छाया पडल्यानें तुकारामांचा देहभाव पालटून गेला; आजपर्यंत जुनाट जुगादीचें नाणें उपलब्ध झालें नव्हतें, त्याचें कारण मूळचा ठाव चुकला होता हें होय ( क. १४८ ). आतां पद्मनाभ जोडल्यावर भाग्य उजळल्यासारखें तुकारामांस वाटूं लागलें ( क. १४९ ). आजपर्यंत क्षणोक्षणीं काळ जिंकीत गेल्यानें, व मागें न पाहतां पुढें पाहिल्यानें, झालेल्या श्रमांचें चीज झालें असें तुकारामांस वाटावयास लागलें ( क. १५१ ) भक्ताचा अंगिकार आपण यातिहीन मतिहीन असल्यानें देवानें केलेला पाहून तुकारामांस आनंद झाला (क. १५३). आज फारां दिवसांची भेट झाल्यानें मनसोक आत्मसुखांत लीन व्हावें असें त्यांस वाटूं लागलें ( क. १५३ ). एवढा लाभ एकाएकीं कां झाला याचें कारणही तुकारामांस कळेना ( क. १५५ ). कितीही आत्मसुखाचा उपभोग घेतला तरी तुकारामांची इच्छाच तृप्त होईना ( क. १५७ ). अंगीं ब्रह्मरस ठसावल्यानें तुकारामांची भाष, तुकारामांसच अनावर झाली; व एका लाभापेक्षां दुसरा लाभ श्रेष्ठ आहे असें वाटून तुकाराम हांवभरी भरले ( क. १५९ ). अंधार नाहींसा होऊन जगदाकार

तेजोमय होऊन गेला ( क्र. १६१ ). कोटिचंद्राच्या तेजाप्रमाणें चकाकणारें देवाचें श्रीमुख अनंत माणकांच्या कोंदणांत देदीप्यमान हिरा शोभावा त्याप्रमाणें शोभूं लागलें ( क्र. १६२ ). दिवस व रात्र यांमधलि भेद नाहींसा होऊन अखंड ज्योत लागून गेली ( क्र. १६३ ). निजरूपामध्यें तुकाराम निजल्यानें अनाहताचे झल्लर वाजूं लागले ( क्र. १६४ ). अनाहतांत मन गुंतल्यानें वृत्तीचा उद्गमच होईना; तुकारामांचे शब्द हे त्यांचे नसून त्यांच्या तोंडून ते देव बोलवितो असें झालें; तें सुख शब्दानें वर्णू गेलें असतां या लोकांस खरें सुद्धां वाटेना (क्र. १६५). जिकडे तुकाराम जातील तिकडे देव त्यांचा पाठलाग करूं लागला ( क्र. १६६ ). स्वरूपानुसंधानांत कार्यव्यापृतत्वाचा लोप होऊन हरि हा भोंवताला भोंवत आहे असें तुकारामांस दिसूं लागलें ( क्र. १६७ ). आतां मी तुजकडे पाहीपर्यंत तूं असाच माझ्या दृष्टीपुढें उभा रहा, असें ते देवास बोलूं लागले ( क्र. १६८ ). जणूं कांहीं तुकाराम आपल्याच पोटास आले असें नवल वर्तून गेलें. दोहींकडे पाहिलें असतां तुकारामांस आपणच आहों अशी भावना उत्पन्न झाली (क्र. १७१). ज्याप्रमाणें नभ आणि जळ एक व्हावें, व याच्या लहरी त्याच्यांत व त्याच्या लहरी याच्यांत मिसळून जाव्या, त्याप्रमाणें देवभक्तसंगम झाला ( क्र. १७३ ). एकदां देवाचें रूप डोळ्यांस दिसल्यानें मन भ्रमिष्टाप्रमाणें वर्तूं लागलें (क्र. १७४); जणूं कांहीं एखादा संचारच अंगीं झाला आहे ( क्र. १७५ )! आतां स्वरूपानुभवावांचून दुसरें कामच नसल्यामुळें आपण फावल्या त्या चेष्टा करूं असें तुकाराम म्हणूं लागले ( क्र. १८० ). अशा स्थितींत देवाची पूजा तरी कशी संभवणार? उदक, गंध, पुष्प, परिमळ, तांबूल, अक्षता, धातु, नैवेद्य, धूप, दीप, सगळें रामकृष्णहरिरूप होऊन गेल्यानें (क्र. १८४) "सर्वं खल्विदं ब्रह्म" याचा अनुभव तुकारामांस आला. ज्याप्रमाणें दिवा हातांत घेऊन हुडकलें असतां अंधार दिसणार नाहीं, त्याप्रमाणें एकदां देवदर्शन झाल्यानंतर तुकारामांस भयभीति उरली नाहीं ( क्र. १८८ ). कामक्रोधांनीं घर खालीं केल्यावर विठ्ठलानें आंत संचार केला ( क्र. १८९ ). स्वामीच्या सत्तेनें कळिकाळ हाताखालीं आला ( क्र. १९२ ). ज्यानें जगास खावयाचें त्याच्या माथ्यावर तुकारामांनीं पाय दिला ( क्र. १९४ ). तुकारामांनीं ज्या वेळीं आपलें मरण आपल्या डोळ्यांनीं पाहिलें, त्या वेळीं झालेला सोहळा अनुपम्य होय. तीन्हीं त्रिभुवनें आनंदानें भरून सर्वात्मकपणानें तुकारामांस भोग प्राप्त झाला ( क्र. १९६ ). शरीराची प्रेतयात्रा झाली तेव्हां कामक्रोधमाया

रडूं लागल्या; वैराग्याच्या शेणींनीं शरीर पेटल्यावर ज्ञानाग्नीचा भडका होऊन महा-वाक्यरूपी बोंब जगांत झाली; कुळनामरूपास तिळांजुळि देऊन तुकारामांनीं ज्याचें शरीर त्यास समर्पिलें ( क्र. १९७ ). अशा रीतीनें तुकाराम मनांत निर्भर बनल्यानें पित्याचें जें धन तें त्यांस सहजच मिळालें ( क्र. २०२ ). वडिलांनीं आपल्या खांद्यावर वाहून शेवटीं तुकारामांस एकाएकी मिराशीचा धनी केलें (क्र.२०३). तुकारामांच्या हातांत भांडाराची किल्ली आल्यानें पाहिजे तो वाण त्यांजकडे उपलब्ध होऊं लागला ( क्र. २०४ ). ज्यानें जें मागावें तें त्यास प्राप्त होऊन, 'नाहीं' असें उत्तर येईनासें झालें ( क्र. २०८ ). देव व भक्त यांच्या कुळाचें परस्पर उच्चारण होऊन तुकारामांस सामरस्याचा अभिषेक झाला, व उन्मनीरूप दिव्य एकछत्रा-खालीं अनुहत नौबत वाजत असतां तुकयास्वामीनें आपल्या दासास निजपदीं स्थापिलें ( क्र. २०७ ). आतां तुकारामांचे बोल हे देवाचे बोल नव्हेत असें कोण म्हणेल ! ( क्र. २०९ ). भावारूढ तुका ही विठोबाचीच मुद्रा असल्यानें त्यास जे मानणार नाहींत त्यांस शासन अवश्य घडेल ( क्र. २१० ). अभाविक लोकांस मात्र तुकारामांचे शब्द हे देवाचे शब्द होत असें कळेना ( क्र. २११ ). अणू-पेक्षां अणु, व मोठ्यापेक्षां मोठें, रूप घेऊन तुकाराम केवळ आतां उपकाराकरितां जगांत जिवंत राहिले ( क्र. २१७ ). धर्माचें पालन करून पाषांडाचें खंडण करणें येवढेंच काम तुकारामांस शिल्लक राहिलें ( क्र. २१८ ). मागें बहुतां जन्मीं त्यांनीं हेंच कार्य केलें होतें ( क्र. २१९ ). ज्यावेळीं मेरुशिखरास शुक जाऊन त्यानें समाधि लावली, त्यावेळींही तुकाराम तेथें हजर होते ( क्र. २२३ ). आतां मागील झालें तें होवो; यापुढें तरी दुश्चरिताकडे वळूं नका ( क्र. २२६ ). तुम्हांस मीं पातकांपासून मुक्त केलें आहे; केवळ विठ्ठलाचें नाम घ्या म्हणजे झालें; असा आतां तुकारामांनीं लोकांस उपदेश चालविला ( क्र. २२७ ). आम्ही वैकुंठवासी असून साच भावानें वर्तण्याकरितां, व संतांचे मार्ग झाडण्याकरितां, आमचा जन्म आहे; कळिकाळास दरारा बसवून आम्ही आतां भक्तीचा डांगोरा पिटूं, असें तुकाराम म्हणूं लागले ( क्र. २२९ ).

# तुकारामांचा उपदेश.

७. तुकाराम स्वानुभवाधिष्ठित झाल्यावर त्यांच्या तोंडचे जे शब्द निघाले त्यांची किंमत विशेषच आहे हें सांगावयास नको. ज्या मनुष्याची निरहंकार वृत्ति झाली त्याच्या तोंडचे शब्द हे त्याचे नसून त्याच्या तोंडून ते देव बोलवितो असें तुकारामांनींच सांगितलें आहे. तुकारामांस स्वानुभवप्राप्ति झाल्यावर त्यांनीं निरनिराळ्या गोष्टींविषयीं लोकांस कसा उपदेश केला हें आतां आपल्यास पाहणें आहे. प्रथम साधकानें आपलें वर्तन कसें ठेवावें याबद्दल त्यांनीं जे विचार प्रकट केले आहेत ते फार मननीय आहेत. साधकाची दशा उदास असून त्यानें निद्रेस जिंकावें, भोजन परिमित करावें, एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं संभाषण करूं नये (क्र. २३०); आश्रमास स्थान कोठें तरी कोपीगुहा वगैरे करून रहावें; फारसे शब्द न बोलतां इंद्रियांचें दमन करावें; अंतःकरणांत नारायण सांठवावा ( क्र. २३१ ); कंदमुळें खाऊन रहावें ( क्र. २३२ ); अभ्यासानें विषही सेवनांत पडतें; ओलें मूळ खडकाचें सुद्धां अंग भेदून जातें ( क्र. २३३ ); भुजंगास सुद्धां साधनानें हातावर खेळवितां येतें; म्हणून असाध्य साधण्यास अभ्यास अवश्य केला पाहिजे, असें तुकारामांचें मत आहे ( क्र. २३४ ). सर्व कोल्हाळ चुकवून एकांतांत आनंदाचें स्थळ गांठावें, व आळस व निद्रा यांस रामराम ठोकावा ( क्र. २३५ ). प्रपंच व परमार्थ दोन्हीं एकदम करतां येणें शक्य नाहीं असें तुकारामांचें मत आहे; दोन पेवांवर हात ठेवूं गेलें असतां एकदम अधःपातच व्हावयाचा ( क्र. २३६ ). संसाराच्या संगानें परमार्थाची इच्छा करणें म्हणजे ढेंकणांच्या बाजेवर सुख मिळविण्याची इच्छा करण्यासारखेंच आहे ( क्र. २४३ ). ज्यांच्या योगानें नारायणांत अंतराय घडेल असे बापमाय, प्रियापुत्रबंधु, यांचा संबंध सोडावा ( क्र. २३८ ). सर्व लिगाडें सारून पुढें गेलेल्यांचे माग उमटलेले पाहून आपण त्या वाटेनें जावें ( क्र. २४० ); नाशिवंत देह जाणार आहे असें समजून परमार्थास तांतडी करावी ( क्र. २४१ ); झाडें ओरपून, पाला खाऊन, वल्कलें नेसून, देवाच्या प्राप्तिसाठीं एकांतांत रहावें ( क्र. २४२ ); सुखदुःख समान लेखावें; कधीं पाणी वहावें, तर कधीं पलंगावर शयन करावें; कधीं सज्जनांचा संग होईल, तर कधीं दुर्जनांचा योग घडला असतांही स्वस्थ बसावें, ( क्र. २४९ ); लमघडी अगर परोपकार

होत असतांही असत्य भाषण करूं नये ( क. २५० ); बाहेर कायेचें प्रक्षालन न करितां आंतून मनाचें प्रक्षालन केलें पाहिजे ( क. २५१ ); सोंवळेंपण पत्करावयाचेंच तर कामक्रोधांवांचून राहण्याचें सोंवळेंपण पत्करावें ( क. २५१ ); अंतःकरण रिकामें करून, षड्र्मींचा अंत पुरवून, एका देवाचेंच ध्यान करावें; कारण जेथें आस खुंटते, तेथें देवाचा वास होतो ( क. २५३ ); एखाद्या गुरूच्या शब्दानेंही देवाचा अंतराय घडत असेल तर त्या गुरूचेंही वचन मानूं नये; सारांश, देव जोडण्याकरितां अधर्म लागला तरी करावा, व देव ज्यांयोगें अंतरेल अशा प्रकारचे धर्मही आचरूं नयेत असें तुकारामांचें मत आहे. ( क. २५६ ). संसारांत निश्चिंती मिळवून मग एकांतांत भजन करूं असें कोणी म्हणेल तर त्याची आशा व्यर्थ आहे; विषयसंगानें यांत केवळ कुचंबणाच होईल ( क. २५८ ). जडभारी पडलें असतां दासानें हरीचें स्मरण करावें; कारण, नामाचें स्मरण केलें असतां विघ्नें बारा वाटा पळून जातील ( क. २५९ ); आणि देवावांचून आपल्यास दुसरा कोणताच व्यवसाय नाहीं असें समजून ध्यानीं, मनीं, जागृतीं, स्वप्नीं, अखंड एका देवाचेंच चिंतन करावें ( क. २६० ), असें तुकाराम सांगतात.

८. गुरु कसा असावा याबद्दल तुकारामांचे विचार मनन करण्यासारखे आहेत. जो आपल्या शिष्यांपासून सेवा घेत नाहीं, व त्यांस देवासारखे मानतो, त्याचाच उपदेश फलद्रूप होतो असें तुकारामांचें म्हणणें आहे ( क. २६१ ). अंगांत कोणत्याही प्रकारें संतचिन्हें उमटलां नसतां जो लोकांस उपदेश द्यावयास लागला, त्याची स्थिति आपणांस पोहावयास येत नसतां दुसऱ्यास कांसेस लावणाऱ्याप्रमाणें होऊन दोघांसही एकदम अधोमज्जन प्राप्त होतें (क. २६२). कांहीं गुरु आपल्या शिष्यांस दृष्टि टवकारून, रग लावून, झगमग पाहण्यास शिकावितात; पुष्कळ गुरु पाखंड मांडून गुरूपदेश हें एक जीविकेचें साधनच करतात; कांहीं गुरु तर आपलाच जप करवितात (क. २६३); ब्रह्मामध्यें यातिकुळाचा विचार करण्याचें कारण नाहीं असें कांहीं प्रतिपादितात; कांहीं लोक अनामिकास आत्मिक मानतात; कित्येक गुरु टाणेटोणे करून कांहीं विप्रांस शिष्य करतात; उपदेश देऊन द्रव्य घेणें हा कित्येकांस एक व्यवहारच होऊन बसलेला असतो (क. २६४). कित्येक आपली पात्रापात्रता, शिष्यांची पात्रापात्रता, याविषयीं विचार न करितां उपदेश देतात; अधिकारावांचून बलात्कारानें उपदेश देणें म्हणजे जेथें ओल नाहीं अशा जागेंत

बीज व्यर्थ वेंचण्यासारखें आहे; याचमुळें तुकाराम मेघवृष्टीनें उपदेश करावा असें सांगतात ( क. २६५ ).

९. खऱ्या गुरूपासून नामस्मरणाचा मार्ग मिळाल्यावर त्यापासूनच देवाची प्राप्ति होते असें तुकाराम रोखठोक सांगतात. एके ठिकाणीं निवांत बसून चित्त शुद्ध करून "रामकृष्णहरि" हा मंत्र उच्चारला असतां अंतःकरणांत गोपाळ निश्चयानें येऊन राहील असें तुकारामांचें अभिवचन आहे (क. २६६); सर्व साधनांमध्यें नामसंकीर्तन हेंच सोपें साधन आहे; त्यानें सर्व पातकांचें भस्म होऊन नारायण घरास सुखानें चालत येतो; यावांचून दुसरें साधन असल्यास देवाचीच शपथ आहे असें तुकाराम सांगतात (क. २६७). नाम उच्चारलें असतां पुढें जगजेठी उभा राहील तरच तें नाम सबीज होय ( क. २६८ ). सर्व वेदांमध्यें, शास्त्रांमध्यें, व पुराणांमध्यें देवास शरण जाऊन निजनिष्ठेनें नाम घेणें हाच एक मार्ग सांगितला आहे ( क. २७१ ). सात दिवसांचा उपवासी जरी मनुष्य झाला तरी त्यानें नामस्मरण सोडूं नये; मस्तक फुटो अगर शरीर तुटो, नामाचा गजर सोडूं नये; अशा निर्धारानें जो नामस्मरण करतो त्यासच देवाची प्राप्ति होते (क. २७४). नामस्मरण करीत असतां जिभेवर अमृताचा स्राव होतो; नाना प्रकारचे लाभाचे शकुन होतात; पोट भरल्याप्रमाणें तोंडांतून आनंदाचे उद्गार निघतात (क. २७५); शरीर शीतळ होतें; प्रेमरसानें अंगकांति पुष्ट होते (क. २७६); चित्त धुवून निघतें (क. २७७); व षड्र्मींचा जय होतो ( क. २७८ ). वाट चालत असतां, धंदा करीत असतां, ग्रासोग्रासीं जो नर नामस्मरण करतो तो जीवन्मुक्त होय असें जाणावें (क. २७९). समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान केलें असतां जें पुण्य प्राप्त होतें तें पुण्यही नामस्मरणाच्या तोडीस येत नाहीं ( क. २८० ). या नामस्मरणानें न कळणारें कळों येईल, न दिसणारें दिसूं लागेल, न बोलतां येण्याजोगें बोलतां येईल; असे अपार लाभ होतील (क. २८१). नामस्मरण हाच निर्वाणीचा बाण आहे असें समजून आपली वाचा व्यर्थ वेंचूं नये ( क. २८२ ). उठाउठीं सारासार विचार केला असतां सर्व संकटें निरसतील ( क. २८३ ). ब्रह्मरसकाढा घेऊन विठोबाच्या नामाचें पथ्य केलें असतां भवरोगही नाहींसा होईल; मग इतर रोगांची किंमत ती काय (क. २८४)? देह हा भोगाचे अधीन आहे असें समजून, व हा सर्व पसारा क्षणभंगुर आहे अशी खात्री पटून, नारायणाचें चित्तांत ध्यान करावें ( क. २८५ ). त्यामुळें शेवटीं अविनाशसुख प्राप्त होईल, इहपरलोकांमध्यें जय मिळेल, व इतर जनांवर उपकार करण्याचें

सामर्थ्य प्राप्त होईल ( क्र. २८६ ). या नामाचें इतकें महत्त्व आहे कीं तें देवास सुद्धां कळत नाहीं. कुमुदिनीचा परिमळ तिला मुळींच माहीत नसतां भ्रमर जसा त्याचा उपभोग घेतो, त्याप्रमाणें देवाच्या नामाचें महत्त्व देवास माहीत नसून भक्तांसच माहीत असतें, असें तुकाराम म्हणतात ( क्र. २८९ ).

१०. नामस्मरणाप्रमाणेंच कीर्तनाचें महत्त्वही फार मोठें आहे. नामदेवांच्यानंतर तुकारामांसारखा साक्षात्कारी कीर्तनकार झाला असेल किंवा नाहीं याची शंकाच आहे. कथा केली तर अशी करावी, तुकाराम म्हणतात, कीं ज्यामुळें कीर्तनांत रंगून देव आपल्यापुढें उभा राहील. भावानें कीर्तन करणें हें आपण तरण्याचें, व दुसऱ्यांस तारण्याचें, एक मोठें साधनच आहे ( क्र. २९० ). ज्याचा हरिकथेवर विश्वास नाहीं त्याचे कान केवळ उंदराचें बीळ होत ( क्र. २९१ ). ज्याप्रमाणें व्याधीनें पीडलेला मनुष्य आपोआप वैद्याच्या घराकडे जातो, अगर गूळ पाहि_ ल्याबरोबर ज्याप्रमाणें मुंगी त्याकडे धांव घेते, त्याप्रमाणें ज्याला स्वहित करणें असेल तो हरिकथेकडे धांवून जातो ( क्र. २९२ ). कथाकीर्तन करण्यास मुख्य सामुग्री म्हणजे देहांतील बळ हीच होय; यामुळें मरेपर्यंत माझीं गात्रें शिथिल होऊं देऊं नकोस, असें तुकारामांनीं देवाजवळ मागणें मागितलें आहे (क्र. २९३). हरिकथा ही एक ऊर्ध्ववाहिनी गंगा आहे; अगर देवभक्तनाम यांचा तो त्रिवेणीसंगम आहे असें म्हटलें असतांही चालेल ( क्र. २९४--२९५ ). द्रव्य घेऊन कथा करणें म्हणजे पातकाचें द्वार उघडें राखण्यासारखेंच आहे. देव एक साह्य असला म्हणजे पुरे, माझी कथा करवा असें मी कोणास म्हणेन तर माझी जिव्हाच झडून दे, असें तुकाराम म्हणतात ( क्र. २९६ ). जेथें आपण कीर्तन करावें तेथें अन्न घेऊं नये, कपाळास बुक्का लावूं नये, गळ्यांत माळ घालूं नये, तट्टावृषभास दाणा मागूं नये; कारण या कामीं द्रव्य घेणारे व देणारे दोघेही नरकाप्रत जातात (क्र. २९७). प्रेमानें कीर्तन चालविलें असतां अंगात अद्भुतशक्तीचा संचार होतो ( क्र. २९८). समाधीचें सुख ओंवाळून टाकावें अशा प्रकारचा आनंद या कीर्तनांत उत्पन्न होतो ( क्र. २९९ ). सुदर्शन सभोंवतीं फिरत असल्यानें कळिकाळाचा रिघाव तेथें होत नाहीं (क्र. ३००). भीतीची शंकाही मनांत न बाळगतां भक्तानें कीर्तन करावें, म्हणजे देव आपोआप पुढें धांवत येतो, असें तुकाराम म्हणतात ( क्र. ३०२ ).

११. नामस्मरण व कीर्तन यांच्या चर्चेनंतर, तुकारामांच्या मतें भक्तीचें सर्वसाधारण स्वरूप कसें होतें तें आपण आतां पाहूं. भक्तिमार्ग हाच सर्वांत

सोपा पंथ आहे असें त्यांचं मत असून ( क. ३०५ ), सर्वां ठिकाणीं देव पाहणें हीच भक्ति आहे असें त्यांस वाटत होतें ( क. ३०४ ). देव सगुणही नाहीं व निर्गुणही नाहीं; त्याचं खरं स्वरूप अगम्य आहे, असें तुकाराम म्हणतात (क. ३०६). देवानें सुस्वर कंठ दिला नसला, तथापि अंतःकरणांत भक्ति ठेवून कशाही रीतीनें आपण रामकृष्णहरीचें भजन करावें ( क. ३०७ ). याचें कारण, भोळ्या लोकांच्या ताब्यांत देव जसा असतो, तसा तो ज्ञान्यांच्याकडे नसतो ( क. ३०९). अंतरांमध्यें खरी भक्ति उत्पन्न झाल्यावांचून बाह्याचार करणें हें केवळ मूर्खपणाचें होय ( क. ३१० ). सती जाणाऱ्या स्त्रीस ज्याप्रमाणें अग्नि पाहून आनंदाचे रोमांच उठतात, त्याप्रमाणें ईश्वरप्राप्तीच्या मार्गांतील विघ्नें पाहून आपल्यास आनंद व्हावा ( क. ३११ ). पतंग हा जसा नीट दीपावर जाऊन पडतो, त्याप्रमाणें ईश्वर-प्राप्तीविषयीं आपण धैर्यानें प्रयत्न करावा ( क. ३१२ ). कारंजा ज्याप्रमाणें वर उडतो, त्याप्रमाणें स्वहिताच्या जिव्हाळ्यानें आपण देवाकडे धांव घेतली पाहिजे ( क. ३१३ ). उन्मनींत ज्याप्रमाणें योगिराजास निंदास्तुति ऐकूं येत नाहींत, अगर जळाआंत ज्याप्रमाणें पद्मपत्र अलिप्त असतें, त्याप्रमाणेंच भक्तिमान् पुरुषानें व्यवहारांत न सांपडतां देवाकडे लक्ष दिलें पाहिजे ( क. ३१५ ).

१२. ईश्वरप्राप्तीमध्यें जातिधर्माचें कारण नाहीं; कोणत्याही योनींत अगर कोणत्याही देशांत हरीच्या दासांनीं जन्म घेतला तरी त्यांच्या योगानें तीन्ही लोक पावन होतात. व्यर्थ अभिमानानें नाडून जाऊं नका, अंत्यजादि योनिसुद्धां हरिभजनानें तरून गेल्या आहेत ( क. ३१६ ). कस्तुरीचें बाह्यरूप जरी हीन असलें तथापि तिचें मोल फारच असतें ( क. ३१७ ). आपल्या हातून पूर्वी कसलींही कर्मे झालीं असलीं तरी अनुतापानें हरीचें स्मरण केलें असतां तीं दूर झालींच पाहिजेत ( क. ३१८ ). हरिनामसंकीर्तन ज्यास आवडत नाहीं तो ब्राह्मण असला तरी ब्राह्मण नव्हे ( क. ३१९ ). परंतु शांति, क्षमा, दया, यांनीं भूषित रामकृष्णनामाचा उच्चार करणारा अंत्यजही ब्राह्मण होय (क. ३२०). याच्या उलट तुकारामांनीं दुसरे एके ठिकाणीं असेंही म्हटलें आहे कीं ब्राह्मण जरी कर्मभ्रष्ट झाला तरी त्यास श्रेष्ठ समजावें ( क. ३२१ ); व मन उन्मन होईपर्यंत या गोष्टींची सोय पाळावी लागते ( क. ३२२ ), असें तुकाराम म्हणतात.

१३. तुकारामांचा पंढरीसांप्रदाय असल्यानें त्यांनीं पंढरीचें महत्त्व वाढवावें हें साहजिकच आहे. संतांनीं हें पलीकडे लावलेलें निशाण पाहून याच वाटेनें चला, तम्हांस पांडुरंग खात्रीनें भेटेल, असें तुकाराम गर्जून सांगतात ( क्र. ३२५ ). याच मार्गानें मागील साधुसंत गेले आहेत, उगाच आडवाटेनें जाऊं नका ( क्र. ३२६ ). चंद्रभागेच्या तीरास तारूं लागलें आहे; आतां हें अमुप धन तुम्ही खुशाल लुटा; मी तुम्हांजवळ हमाल झालों आहे ( क्र. ३२८ ), असें तुकाराम म्हणतात. या पंढरीच्या राजास जाणत्यांपेक्षां नेणत्यांची आवड जास्त आहे. तो तुमचा शीण घेऊन तुम्हांस सुख देईल ( क्र. ३२९ ). आत्मप्राप्तीच्या मार्गांत अनुभवास येणारी अंतरींची ज्योतच विठ्ठलरूपानें विटेवर विनटली आहे ( क्र. ३३० ). हातांत प्रेमरूपी पाश घेऊन तुमचें सर्व लुबाडण्याकरितां हा चोर पंढरीस उभा आहे. पुंडलिकानें याला थारा दिला नसता तर तो येथें आलाच नसता; त्याला आपण जाऊन धरूं असें तुकाराम म्हणतात ( क्र. ३३२ ). हा पंढरीचा देव म्हणजे एक मोठें भूतच आहे; आल्यागेल्यांस तें पछाडतें, व तेथें जो जातो त्याचा परतून येण्याचा मार्ग बंद करतें; तुकाराम अशाच रीतीनें पंढरीस जाऊन त्यांचें जन्मास जाणें येणें खुंटून गेलें, असें त्यांनीं म्हटलें आहे ( क्र. ३३५ ).

१४. भक्तिमार्गास सगुणाची जितकी चाड असते तितकी निर्गुणाची असत नाहीं, हें तुकारामांच्या विचारांवरून व अनुभवावरून दिसून येईल. आम्हांस अरूपस्थितीची चाड नसून स्वरूपस्थितीची चाड आहे असें त्यांनी वारंवार म्हटलें आहे. अरूपस्थितीनें तूं खुशाल ब्रह्मज्ञानी लोकांस पिसें लाव, परंतु आम्हां भक्तांचा प्रेमरस तूं खंडूं देऊं नकोस, असें त्यांनीं देवाजवळ मागणें मागितलें आहे ( क्र. ३३७ ). आम्हीं मोक्षपदावर लाथ मारली असून निराकार देवास आम्हीं आकार घ्यावयास लावितों, हें आम्हां भक्तांचें केवढें सामर्थ्य होय ( क्र. ३३८ )! जो भ्रमर काष्ठाचा गुमान करीत नाहीं तो सुमनांमध्यें सहज सांपडतो; त्याप्रमाणें आमच्या सुमनांमध्यें देवास सहजच भीतीनें आकार घ्यावा लागतो ( क्र. ३३९ ). हिरा शोभण्यास ज्याप्रमाणें तो कोंदणांत बसवावा लागतो, त्याप्रमाणें देवास महत्त्व येण्यास आम्हां भक्तांची त्यास जरूर आहे ( क्र. ३४० ). आम्ही देव झालों असें जे म्हणतात ते खरोखर पतन पावतात; देवानें मोठमोठे दैत्य मारले आहेत; तुमच्यानें तृणही मोडवत नाहीं ( क्र. ३४१ ), जो मी देव देखिला अशी बढाई

मारतो, तो लटक्यांचा राजा असें समजावें ( क्र. ३४३ ). अद्वैतांत आम्हां भक्तांचें समाधान नसून देवभक्तपणाच्या सुखाचा सोहळाच आम्हांस श्रेष्ठ वाटतो ( क्र. ३४४ ). वैकुंठींच्या वासापेक्षां कथाकाळींचा रस हाच अद्भुत आहे, तुझ्या नामाचा महिमा आम्हां भक्तांस जसा कळतो तसा तुला कळत नाहीं, असें तुकाराम देवास म्हणतात ( क्र. ३४८ ). यामुळेंच भक्तांस गर्भवासाची पर्वा वाटत नाहीं; मात्र त्यांस संतसंगति असली म्हणजे झालें ( क्र. ३४९ ). जो हें शरीर चालवितो, मानसाच्या अहंवृत्तीमध्यें जो अंतर्भूत असतो, ज्याच्यावांचून वृक्षाचें पानही हालत नाहीं, अशा देवाचें भजन कोणी विसरूं नये ( क्र. ३५१ ). बुद्धीचा दाता, व विश्वाचा चालक, जो परमात्मा त्यावर सर्व भार घालून स्वस्थ रहावें ( क्र. ३५३ ). ज्याप्रमाणें वानरांकडून देवानें समुद्रावर शिळा तारविल्या त्याप्रमाणें आपण केवळ निमित्तमात्र असून देव सर्वकर्ता आहे असें समजावें ( क्र. ३५४ ). दारोंदारीं कुत्र्याप्रमाणें हिंडण्यापेक्षां मागणें तें एका देवापाशींच मागावें ( क्र. ३५५ ). जगांत सज्जनदुर्जनांचा भेद विसरूं नये; विंचू, सर्प, हे नारायण खरे, पण त्यांस दुरूनच नमस्कार करावा ( क्र. ३५९ ). पृथ्वीच्या पोटांत हिरा व गार दोन्हीं निर्माण होतात, म्हणून त्यांस समसमान लेखतां येणार नाहीं; त्याप्रमाणें संत व असंत हे केव्हांही एक होऊं शकत नाहींत ( क्र. ३६० ), असें तुकाराम म्हणतात.

१५. देवभक्तांमधील संबंध अनिर्वर्णनीयस्वरूपाचा आहे. जो भक्त मनापासून देवाची सेवा करतो त्यास देवास भ्यावें लागत नाहीं ( क्र. ३६१ ). भक्ताजवळ ज्या ज्या शक्ति असतील त्या त्या त्यानें ईश्वरास समर्पण कराव्या (क्र. ३६२), देवावर भक्तानें भार घातला असतां त्याची तो उपेक्षा करीत नाहीं, ( क्र. ३६४ ). सर्व लौकिकाची चाड सांडून मात्र भक्तानें देवास आळविण्यास तयार झालें पाहिजे; झाडाचा पाला ओरबाडून, चिंध्यांचें वसन गुंडाळून, निर्वाण मांडून, देवाचें ध्यान केलें असतां देव भक्ताची उपेक्षा करीत नाहीं ( क्र. ३६६ ). देवाचा भक्त कोणी वायां गेला नाहीं या भावनेनें तर भक्त देवाच्यामागें लागतात ( क्र. ३६८ ). भक्तानें धैर्य धरिलें असतां नारायणाचें त्यास खचित साहाय्य मिळतें ( क्र. ३६९ ). पाहिलें असतां कोठें न दिसून देव मध्येंच एकदम उडी घालतो ( क्र. ३७१ ). मागें पुढें सर्व ठिकाणीं काळाच्या सपाट्यांत आपण सांपडलों असतां पळून न

जातां देवास मोठ्यानें आळविलें असतां देव आपल्यास खांद्यावर वाहील (क्र. ३७३). देव ज्यास राखण्याची इच्छा करतो त्यास मारण्यास कोण समर्थ आहे (क्र. ३७४)? कड्याकपाटांत योगिराज ध्यानास बसले असतां त्यांची तहानभूक देवास राखावी लागते ( क्र. ३७७ ). आपण गडबड न करितां योग्य काळीं देव आपलें रक्षण करील असें समजून स्वस्थ रहावें ( क्र. ३७९ ).

१६. संतांचीं लक्षणें सांगण्यास तुकारामांइतका अधिकारी कोण आहे ? ज्यांनीं आपलें सर्व आयुष्य संतांच्या मार्गांत घालविलें, त्यांस संत व असंत यांमधील भेद खचित माहीत असला पाहिजे. हिरे व गारा दुरून सारख्याच दिसतात; पण ज्यावेळेस त्यांवर घांव बसावा त्यावेळेसच त्यांची परीक्षा होते. त्याप्रमाणें संत व असंत निवडून काढण्यास योग्य प्रसंग यावे लागतात ( क्र. ३८४ ). केवळ कवित्वानें संत होत नाहींत; संतांच्या आप्तपणानें संत होत नाहींत; भोंपळा धरून, कीर्तन करून, प्रवचनें सांगून, माळामुद्रांचीं भूषणें घालून, किंवा भस्म धारण करूनही संत होत नाहींत; देहभाव जोंपर्यंत निरसला नाहीं, तोंपर्यंत संतपण मिळणें कठीण आहे (क्र. ३८५ ). उगाच एखाद्या बाईनें चिरगुटें घालून पोट वाढविलें, तर जोंपर्यंत तिच्या स्तनांत दूध नाहीं, व पोटांत पोर नाहीं, तोंपर्यंत तिचे सर्व डोहाळे व्यर्थच होत ( क्र. ३८६ ). ऐरणीवर ठेविला असतां घणाचा जो घाव सोशील तोच हिरा ( क्र. ३९० ). अशा संतांचें देह धरण्याचें कारण म्हटलें म्हणजे जडजीवांस उद्धरणें हेंच होय ( क्र. ३८९ ). केवळ भूतभविष्यवर्तमान सांगून अगर वाचासिद्ध होऊन संतपण मिळत नाहीं ( क्र. ३९३ ). ज्यानें देवास उच्चस्थानावर उभें राहून पाहिलें त्यास कोणाचीही भीति वाटणें शक्य नाहीं ( क्र. ३९५ ). त्यास या जगांत सोयरेपिशुन कोणी नसून अवघे माहेर घनदाट भरल्याप्रमाणें दिसतें ( क्र. ३९८ ). असे संत प्रसंगीं मेणाहूनही मऊ, पण कदाचित् वज्रापेक्षांही कठोर, असे होतात ( क्र. ४०० ). जडभारी पडलें असतांही ते आपल्या नेमास टळत नाहींत ( क्र. ४०१ ). जीव दान दिल्याखेरीज अशाप्रकारचें संतपण मिळणें अशक्य आहे ( क्र. ४०२ ). तीर्थांत केवळ धोंडापाणी असून अशा संतांमध्येंच केवळ देव असतो ( क्र. ४०५ ). रवि, दीप, हिरा, अशीं बाहेरचीं दृश्यें घेऊन काय करावयाचीं ? हे संत अदृश्य दर्शनें दाखवितात ( क्र. ४०६ ). आपल्या उदारपणानें ते अमूल्यधनाचें आल्यांगेल्यांस दान करितात ( क्र. ४०७ ). मागें हजारों लोकांनीं जरी हें

जुनाट भांडार लुटलें आहे, तरी तें अद्याप सरलें नाहीं ( क्र. ४०८ ). या संतांची भेट झाल्यास पाप, ताप, दैन्य नाहींसें होतें हें सांगावयास नको (क्र.४१०). अशा प्रकारच्या संतांचा छळ जर खलदुर्जन करूं लागले, तर हत्तीच्या मागें लागून भुंकणाऱ्या श्वानाप्रमाणें ते आपल्यास हास्यापद करून घेतात (क्र. ४११), असें तुकाराम महाराजांचें म्हणणें आहे.

**१७.** अशा श्रेष्ठ संतांमध्यें व देवांमध्यें कोणताही भेद नाहीं; प्रतिमा या केवळ निमित्तमात्र होत; निराकारांत सर्व दिशा ओस भासतात, पण येथें सर्व इच्छा पुरतात ( क्र. ४१३ ). देव व भक्त ही निराळी भाषा रहातच नाहीं, पाप व पुण्य हें केवळ बहुरूप्याचेंच सोंग आहे असें वाटतें ( क्र. ४१६ ). बीजाच्या पोटीं तरुवर, व तरुवराच्या शेवटीं बीज, हें अखंड चाललेंच आहे ( क्र. ४१७ ). तथापि भक्तांची मौज अशी आहे, कीं ते अभेदस्थितीप्रत जाऊनही अंगीं भेद दाखवितात ( क्र. ४१८ ). जो प्रत्यक्ष अशारीतीनें देवस्वरूप बनेल, त्यासच या गोष्टी खऱ्या वाटणार आहेत; इतरांना ही केवळ रेमट कहाणी वाटेल (क्र. ४१९). आणखी एकाप्रकारें पाहूं गेलें असतां, भक्तच देवापेक्षां श्रेष्ठ ठरतील ( क्र. ४२० ); कारण ज्याच्या पोटांत चौदा भुवनें आहेत तो यांच्या कंठांत सांठविला जातो (क्र.४२३) असें तुकाराम म्हणतात.

**१८.** आतां आपण तुकारामांची निर्गुणशिकवण कशी होती तें थोडक्यांत पाहूं. जगव्यापक जनार्दन हा या जगाच्या अंतर्यामांमध्यें एक सूत्रच आहे असें उपनिषत्कारांप्रमाणें तुकारामांचें मत होतें ( क्र. ४२७ ). आपल्या पोटास मागणाऱ्या शेंदऱ्यां हेंदऱ्यां दैवतांना विचारतो कोण ( क्र. ४२६ ) ? हा देह आपला नव्हे अशी ज्याची खात्री पटली, त्यासच देवाचें व आपलें ऐक्य कळून येणार आहे ( क्र. ४२८ ). लोकांमध्यें देव आहे असें सांगावें, पण अंतःस्वरूपानें आपण देव बनल्यावर देवपणा निराळा असा कोठें राहिला ( क्र. ४२९ ) ? आकाश आकाशांत मिसळून जातें, मधला घटमठ हा व्यवहार खोटा ठरतो; बीज बीजांत सामावतें, मध्यें आलेलें पत्रपुष्प खोटें होय (क्र. ४३१); अशा रीतीनें पाहिलें असतां देव फटकळ, देव्हारा फटकळ, भक्त फटकळ, व अंगाराही फटकळच आहे ( क्र. ४३२ ). लटके तुकाराम लटक्या भावानें लटक्या मनुष्याबरोबर ही केवळ लटकी चर्चा करीत आहेत ( क्र. ४३३ ).

१९. अशा रीतीनें तत्त्वज्ञानाच्या जोरावर जरी निर्गुणस्थिति अशी मांडतां आली, तरी या स्थितीस पोंचण्यास ईश्वरसाक्षात्कारामधूनच गेलें पाहिजे; नाहीं तर या सर्व गोष्टी दंतकथेप्रमाणें वाटतील ( क. ४४० ). येथें केवळ साधनानेंच काम होतें असें नाहीं; देवाची कृपा झाल्यावांचून स्वरूपसाक्षात्कार होणें कठीण आहे ( क. ४४२ ). जितका आंब्याच्या झाडास मोहोर येतो तितकीं त्यास फळें लागत नाहींत; फळें लागतात त्यांपैकीं सर्व पक्व होत नाहींत; आणि पक्व झालेल्या फळांमध्येंसुद्धां आढीमध्यें जीं कुजत नाहींत तींच फळें उपयोगास येतात. शेवटचें वैभव भोगण्याचें भाग्य फार थोड्यांसच लाभतें. तुकाराम म्हणतात कीं तोच आपला गडी म्हणण्यास हरकत नाहीं, कीं ज्यास पैलतीरास पोंचण्याचें भाग्य प्राप्त झालें ( क. ४४१ ). शुकसनकादिकांनीं बाहु उभारून सांगितल्याप्रमाणें परीक्षितीस सातच दिवसांत देवाचा साक्षात्कार झाला; यावरून उठाउठीं स्मरणाचा धांवा केल्यावर देवास धीर धरवत नाहीं असें सिद्ध होतें ( क. ४४४ ). देवाच्या ध्यानानें चक्षु दिव्य होतात ( क. ४४३ ); मनासहित काया पालटते ( क. ४४५ ); व स्वरूपानुभवाबद्दल इंद्रियांमध्यें परस्पर भांडण लागतें ( क. ४४८ ). लाजेला थारा न देतां ( क. ४५० ), अंतरांत कळवळा उत्पन्न होऊन, ज्यावेळीं नेत्रांतून जळ वाहूं लागतें ( क. ४५१ ), त्या वेळींच मन स्थिर होऊन तीन्हीं लोकांमध्यें आनंद भरलेला दिसतो ( क. ४५२ ). नामरूपाची गांठ पडल्यावर इतर सर्व गोष्टी खाटयाशा वाटतात ( क. ४५३ ). रक्त, श्वेत, कृष्ण, पीत, प्रभेचें अंजन डोळ्यांत पडल्यावर देशकालवस्तुभेद नाहींसा होऊन विश्वाकार आत्मा प्रकट होतो ( क. ४५४ ); अणुरेणूपर्यंत सर्वत्र प्रकाश भरलेला दिसतो ( क. ४५५ ); वनपट्टणांत एकभाव होऊन जिकडे तिकडे देवाचें स्वरूप दिसावयास लागतें ( क. ४५७ ). अशा स्थितींत देवाच्या चरणांवर आपण माथा ठेवावा तो उचलूंच नये; कारण मन ढवळलें असतां रूपही वितळून जाईल ( क. ४५६ ). ज्यास अशा रीतीनें सर्वदा अच्युताचें ध्यान लागलें, त्याचा देहही पवित्र होतो; त्याच्या चिंतनानें दोषी लोक तरून जातात; देवही त्याच्या मागें लागून त्याच्या चरणींचे रजःकण आपल्या शिरावर घेतो ( क. ४५९ ). हरिकीर्तन करीत जाणाऱ्या भक्ताबरोबर देवही भ्रमण करतो ( क. ४६० ). निजून भक्तानें गायन केलें असतां देव तें उभ्यानें ऐकतो; भक्त बसून कीर्तन करील तर देव डोलूं लागतो; आणि भक्तानें उभें राहून नामस्मरण केल्यास गोविंद नाचावयास

लागतो ( क्र. ४६२ ). अंतःकरणांत सांठवला राहून देव बाहेर धाकुटी मूर्ति धारण करून भक्तापुढें उभा राहतो; भक्तानें कांहींतरी मागावें म्हणून देव त्याच्याकडे पाहतो; ह्याच्या मनांत ज्या ज्या इच्छा उत्पन्न होतील त्या त्या तो पूर्ण करतो; तथापि भक्त आपला जीवभाव देवाच्या पायीं ठेवून त्याजजवळ कांहींच मागत नाहींत ( क्र. ४६४ ). अशी स्थिति प्राप्त झाल्यावर नंतर भक्तांस झालेल्या श्रमाचें कौतुक वाटावें हें साहजिकच आहे; ते केवळ चार दिवस खेळीमेळीकरितां या जगांत राहतात ( क्र. ४६८ ).

२०. तुकारामांनीं आपली शिकवण जशी मागें लिहिल्याप्रमाणें अभंगांतून उघड मांडली आहे, त्याप्रमाणें त्यांनीं रूपकांतूनही आपली शिकवण गुप्तरूपानें लिहिली आहे. तुकारामांच्या सर्व रूपकांचा येथें विचार करण्यास जागा नाहीं. आपण त्यांचीं दोनतीनच रूपकें येथें पाहूं. मागें शिवाजीस उपदेश म्हणून "पाइकीचे अभंग" तुकारामांनीं सांगितले आहेत असें आपण लिहिलेंच आहे. ते अभंग एका प्रकारचें रूपकच होत. परमार्थांत प्रपंचाप्रमाणें शिपाईगिरी केल्याखेरीज इष्ट वस्तु साध्य होत नाहीं असा या अभंगांचा सारांश आहे. जो पाईक जिवावर उदार होतो त्याचा भार स्वामी वाहतो; युद्धामध्यें स्वामीच्या पुढें जाऊन जो अंगावर बाण साहतो त्यासच त्याच्या अंगावरचीं शस्त्रास्त्रें शोभा देतात; त्रैलोक्यनायकाचे असे पाईक पुष्कळ आहेत; ज्या पाईकास धनी मानतो त्यास सर्व जग भितें; ज्याप्रमाणें पाईकाचें बळ असेल त्याप्रमाणें त्याचें मोल वाढतें; व पाईक झाल्यावांचून पाईकास ओळखतां येणें अशक्य आहे; असें तुकारामांनीं आपल्या अभंगांत म्हटलें आहे. त्याप्रमाणेंच विठ्ठलनामाचें शेत करा; येथें वेठी, सारा, द्यावा लागत नाहीं; निदसुऱ्यानें शेत राखलें जाणें शक्य नाहीं; आगटी पेटवून शेतकऱ्यानें जागें राहिलें पाहिजे; शेत सुगीस आलें तरी पीक जतन करावयास पाहिजे; गोफणीस गुंडा घालून पांखरांचीं थाटें उडवून दे; एकंदरींत "सोंकर, सोंकर, सोहंकर"; पीक हातास आल्यावर ज्याचा भाग त्यास देऊन भूस टाकून आंतील कण निवडून घे; कण निवडल्यावर मुसळ आधारांत धरून त्यांवर सांवरून थोर घाव घाल; अनाहत गजराचीं कांकणें वाजूं दे; आरशाप्रमाणें रूप प्रकटलें असतां पाक सिद्ध झाला असें समज ( क्र. ४६९–४७२ ), असें तुकारामांनीं म्हटलें आहे. आणखी एक रूपक देऊन हें प्रकरण संपवूं. चौक भरून कुळस्वामिनीस पाचारण कर; तिच्या पुढें रजतमाची धुपारती घाल; पंचप्राणरूपी आरती ओंवाळ; मनरूपी मेंढ्यास

मुटीनें मार; अनाहताच्या मोठ्या नगाऱ्याचा गजर झाला असतां देवता अंगांत संचरेल, व शरीराचें आरोग्य करील; तिला केलेले सर्व नवस ती पुरवील; अंधळ्यांस डोळे, पांगळ्यांस पाय, वांझेस पुत्र ती देईल; ज्या काळानें वसुदेवाचीं सात बाळें खाल्लीं त्या काळास खाण्याजोगें ती आतां आपलें उग्ररूप प्रकट करील; तथापि ती आमच्या कुळींची कुळदेवता असल्यानें मातेप्रमाणें ती आमचें रक्षणच करील असें तुकाराम म्हणतात (क्र. ४७४–४७६).

२१. ज्या संतांस परमार्थाचें बिकट वर्म कळतें, त्या संतांस व्यवहार कळणार नाहीं, असें कधीं होणें शक्य नाहीं. तुकाराम इतके मोठे सत्पुरुष होते, तथापि त्यांचें व्यवहारचातुर्यही फार अलौकिक होतें. काष्ठपाषाणमृत्तिकारूपीही स्त्रियांचा संग नको असें ते म्हणतात; कारण अग्नि जरी साधु झाला तरी त्याचा फार सहवास केला असतां तो दहनच करील ( क्र. ४७८ ). या जगाचें मोठें आश्चर्य वाटतें, तुकाराम म्हणतात, कीं संतांकडून दृष्टि टाळून हे लोक परस्त्रीस मात्र आदरानें न्याहाळतात; कथेमध्यें निद्रा घेऊन हे लोक स्त्रियांशीं संभाषण करीत असतां मात्र जागतात ( क्र. ४७९ ). वरचा दिखाऊ रंग कधीं कामास यावयाचा नाहीं; करणीचें नाणें वृद्धांच्या मनांस येणें शक्य नाहीं ( क्र. ४८१ ). ज्यास आपल्या अंगीं मोठेपणा आणावयाचा आहे त्यानें कठीण यातना भोगिल्याच पाहिजेत ( क्र. ४८२ ). कल्पतरूखालीं बसून भलतें फळ मागूं नये, कारण एखादे वेळीं आपले इच्छेप्रमाणें एखादा अनर्थच घडावयाचा ( क्र. ४८४ ). गुरूनें मेघवृष्टीनें उपदेश करावा, व सहसा शिष्य करूं नये; कारण शिष्य केल्यास त्याच्या अर्धकर्माचा वांटा त्यास भोगावा लागतो ( क्र. ४९२ ). अधिकाराप्रमाणें लोकांस उपदेश द्यावा; मुंगीवर हत्तीचें ओझें घालण्यांत अर्थ नाहीं; पारध्याजवळ फांसे, जाळीं, कुऱ्हाडी, वगैरे सर्व उपकरणें असावींत; परंतु निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या साधनांचा त्यानें उपयोग करावा ( क्र. ४९३. ) संतसंगतींत फारसा वास करूं नये, कारण त्यांचे दोष कदाचित् आपल्या अंतःकरणांत बिंबले असतां त्यांचें क्षालन व्हावयाचें नाहीं ( क्र. ४९४ ). संसारयात्रेस आलेल्या लोकांनीं तोट्याचा सौदा करूं नये ( क्र. ४९५ ). खरें पारखूनच गांठीं बांधावें ( क्र. ४९६ ). देव मिळण्यास रुकामोल कांहीं द्यावा लागत नाहीं; आइत्या घरपुसून आलेल्या देवास परतें घालवूं नये ( क्र. ४९८ ). जगामध्यें

आपलें वर्म कळूं देऊं नये; कारण वर्म समजल्यास विनाकारण लोक पाठीं लागतील ( क्र. ४९९ ). हृद्यांत देवाचें चिंतन करणें याखेरीज दुसरा कोणताच शकुन मानूं नये; ज्याला हरिनामाचा छंद लागला त्याला सर्वकाळ सर्व दिशा कल्याणकारकच होत ( क्र. ५०० ), अशा प्रकारचा सदुपदेश तुकारामांनीं सर्व लोकांस केला आहे.

**२२.** या ग्रंथाचे कामीं रा. सा. वासुदेवराव दामले, प्रो. शंकर वामन दांडेकर, रा. शंकर गणेश म्हैसाळकर, रा. शंकर केशव धर्माधिकारी, व रा. जगन्नाथ रघुनाथ लेले या सर्वांची जी मदत झाली आहे, त्याबद्दल मी त्या सर्वांचा फार आभारी आहे. गणेश छापखान्याच्या मालकांनीं व आर्यभूषण छापखान्याच्या मालकांनीं फार मेहनत घेऊन हें पुस्तक काळजीपूर्वक छापून दिलें याबद्दल मी त्यांचाही फार आभारी आहे.

**रा. द. रानडे**

# तुकारामवचनामृत

## भाग १ ला : तुकारामांचें आत्मचरित्र



## भाग २ रा : तुकारामांचा उपदेश



---

# अनुक्रमणिका.

## भाग १ ला: तुकारामांचें आत्मचरित्र.

### १ तुकारामांच्या चरित्रांतील ऐतिहासिक प्रसंग.

---

## २ तुकारामांची साधकदशा.

---

## ३ तुकारामांच्या अंतःकरणांतील तळमळ.

---

## ४ तुकारामांचे स्वानुभूत्युद्गार.

| अभंग | | पृष्ठ |
|---|---|---|

---

## भाग २ राः तुकारामांचा उपदेश.

### ५ साधनपूर्वरंग.

---

## ६ गुरूपदेश.

---

## ७ नाममहिमा.

---

## ८ कीर्तनाचें महत्व.

## ९ भक्त्युपदेश.



## १० जातिविचार.

---

## ११ विठ्ठलदर्शन.

---

## १२ सगुणविचार.

---

## १३. देवाचें भक्तांविषयीं प्रेम.

---

## १४. संतांचीं लक्षणें.

| अभंग | | पृष्ठ |
|---|---|---|

---

## १५ देवाभक्तांचें ऐक्य.



---

## १६ निर्गुणविचार.

---

## १७ साक्षात्कारविवरण.

---

## १८ रूपकें.



---

अभंग पृष्ठ

## १९ व्यवहारचातुर्य.

# १. तुकारामांच्या चरित्रांतील ऐतिहासिक प्रसंग.

## १. तुकारामांस गुरूचा उपदेश.

सद्‌गुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥
सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥
भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥
काय कळे उपजला अंतराय । म्हणोनियां काय त्वरा जाली ॥
राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची[1] ॥
बाबाजी आपुलें सांगितलें नाम । मंत्र दिला रामकृष्णहरि ॥
माघ शुद्ध दशमी पाहूनि गुरुवार । केला अंगीकार तुका म्हणे ॥

## २. तुकारामांस आवडीचा मंत्र मिळतो.

माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥
आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंफा[2] कांहीं कोठें ॥
जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥
जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तांपे[3] पेटी ॥
तुका म्हणे मज दावियेला तारु । कृपेचा सागरु पांडुरंग ॥

## ३. आपण कुणबी जन्मल्याबद्दल तुकारामांचा आनंद.

बरें देवा कुणबी केलों । नाहीं तरि दंभें असतों मेलों ॥
भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥
विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥
सेवा चुकतों संताची । होचि नागवण फुकाची ॥

---

१ गुरुपरंपरा. २ गुंता. ३ ताफे.

गर्व होता ताठा । जातों यमपंथें वाटा ॥
तुका म्हणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥

४. विठोबाचें नाम हेंच कल्पांतींचें बीज.

पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणीक न करीं तीर्थव्रत ॥
व्रत एकादशी करीन उपवासी । गाइन अहर्निशीं मुखीं नाम ॥
नाम विठोबाचें घेईन मी वाचे । बीज कल्पांतींचे तुका म्हणे ॥

५–६. प्रपंचांतील वैराग्यामुळें विठ्ठलाचा शोध.

आतां काय खावें कोणीकडे जावें । गांवांत राहावें कोण्या बळें ॥
कोपला पाटील गांवींचे हे लोक । आतां मज भीक कोण घाली ॥
आतां येणें चवी सांडिली म्हणती । निवाडा करिती दिवाणांत[1] ॥
भल्या लोकांपासीं सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥
तुका म्हणे यांचा संग नव्हे भला । शोधीत विठ्ठला जाऊं आतां ॥

बरें झालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥
अनुतापें तुझें राहिलें चिंतन । झाला हा वमन संवसार ॥
बरें झालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥
बरें झालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥
बरें झालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥
बरें झालें तुझें केलें देवाईल[2] । लेकरें बाईल उपेक्षिलीं ॥
तुका म्हणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥

७–८. घरीं येणाऱ्या संतांबद्दल तुकारामाच्या बायकोचा संताप.

कोण घरा येतें आमुच्या काशाला । काय ज्याचा त्याला नाहीं धंदा

१ न्यायाची कचेरी. २ देऊळ.

देवासाठीं झालें ब्रह्मांड सोइरें[1] । कोंवळ्या उत्तरें काय वेंचे ॥
मागें पाचारितां नव्हे आराणूक । ऐसें येती लोक प्रीतीसाठीं ॥
तुका म्हणे रांडे नावडे भूषण । कांतेलेंसें[2] श्वान लागे पाठी ॥

न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥
उठितें तें कुटितें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ॥
जिवंतचि मेले । लाजा वाटूनियां प्याले ॥
संवसाराकडे । न पाहाती ओस पडे ॥
तळमळती यांच्या रांडा । घालिती जीवा नांवें धोंडा ॥
तुका म्हणे बरें झालें । घे गे बाइले लिहिलें ॥

९. जिवलग आप्तांच्या मृत्यूमुळें तुकारामांस झालेलें दुःख.

बाप मेला न कळतां । नव्हती संसाराची चिंता ॥
विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥
बाईल मेली मुक्त झाली । देवें माया सोडविली ॥
पोर मेलें बरें झालें । देवें मायाविरहित केलें ॥
माता मेली मज देखतां । तुका म्हणे हरली चिंता ॥

१० भक्ताबद्दलच्या प्रेमामुळें देव त्यास भाग्यवान् करीत नाहीं.

देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वारावार करुनि ठेवी ॥
भाग्य द्यावें तरी अंगें भरे ताठा । म्हणोनि करंटा करुनि ठेवी ॥
स्त्री द्यावी गुणवंती तीपें[3] गुंते आशा । यालागी कर्कशा करुनि ठेवी ॥
तुका म्हणे मज साक्ष आली देखा । आणीक या लोकां काय सांगों ॥

११. नामदेवाची तुकारामांस स्वप्नामध्यें कवित्वाबद्दल आज्ञा.

नामदेवें केलें स्वप्नामाजीं जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥

---

१ समाधान. २ पिसाळलेलें. ३ तिच्याजवळ.

सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥
माप टाकी सळ[1] धरिली विठ्ठलें । थापटोनी केलें सावधान ॥
प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी । उरले ते शेवटीं लावी तुका ॥

१२. नामदेवामुळें तुकारामांस देवाचें स्वप्नदर्शन.

द्याल ठाव तरी राहेन संगती । संतांचे पंगतीं पायांपाशीं ॥
आवडीचा ठाव आलोंसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥
शेवटील स्थळ नीच माझी वृत्ति । आधारें विश्रांति पावईन ॥
नामदेवा पायीं तुक्या स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥

१३. तुकारामांची कवित्वाबद्दल अभिमानशून्यता.

करविली तैसी केली कटकट । वांकडी कीं नीट देव जाणे ॥
कोणाकारणें हें जालेंसे निर्माण । देवाचें कारण देव जाणे ॥
तुका म्हणे मी या अभिमानावेगळा । घालूनि गोपाळा भार असें ॥

१४. कवित्व तरल्यासच पुढें कवित्व करण्याबद्दलची तुकारामांची प्रतिज्ञा.

करूं कवित्व काय नाहीं आतां लाज । मज भक्तराज हांसतील ॥
आतां आला एका निवाड्याचा दिस । सत्याविण रस विरसला ॥
अनुभवाविण कोण करी पाप । रितेचि संकल्प लाज लावी ॥
तुका म्हणे आतां न धरवे धीर । नव्हे जीव स्थिर माझा मज ॥

१५. तुकारामांचा तेरा दिवसांचा निश्चक्र उपवास.

तेरा दिवस झाले निश्चक्र[2] करितां । न पवसी अनंता मायबापा ॥
पाषाणाची खोळ[3] घेउनि बैसलासी । काय हृषीकेशी झालें तुज ॥

---

१ मापाची गणती. २ कडकडित उपवास. ३ तोंडावरून पायापर्यंत घेतलेलें पांघरूण.

तुजवरी आतां प्राण मी त्यजीन । हत्या मी घालीन पांडुरंगा ॥
फार विठाबाई धरिली तुझी आस । करीन जीवा नाश पांडुरंगा ॥
तुका म्हणे आतां मांडिलें निर्वाण । प्राण हा सांडीन तुजवरी ॥

### १९–२२. तुकारामांस देवाचें दर्शन.

तूं कृपाळू माउली । आम्हां दीनांची साउली ।
न संवरीत[1] आली । बाळवेशें जवळी ॥
माझें केलें समाधान । रूप गोजिरें सगुण ।
निवविलें मन । आलिंगन देऊनी ॥
कृपा केली जनाहातीं । पायीं ठाव दिला संतीं ।
कळों नये चित्तीं । दुःख कैसें आहे तें ॥
तुका म्हणे मी अन्यायी । क्षमा करीं वो माझे आई ।
आतां पुढें काई । तुज घालूं सांकडें ॥

थोर अन्याय केला । तुझा अंत म्यां पाहिला ।
जनाचिया बोला-। साठीं चित्त क्षोभविलें ॥
भागविलासी केला सीण । अधम मी यातिहीन ।
झांकूनी लोचन । दिवस तेरा राहिलों ॥
अवघें घालूनियां कोडें[2] । तानभुकेचें सांकडें ।
योगक्षेम पुढें । तुज करणें लागेल ॥
उदकीं राखिले कागद । चुकाविला जनवाद[3] ।
तुका म्हणे ब्रीद । साच केलें आपुलें ॥

कापो कोणी माझी मान । सुखें पीडोत दुर्जन ।
तुज होय सीण । तें मी न करीं सर्वथा ॥
चुकी झाली एक वेळा । मजपासूनी चांडाळा ।

---

१ आपल्यास न लपवितां. २ संकट, ३ जनापवाद.

उभें करोनियां जळा-। माजी वह्या राखिल्या ॥
नाहीं केला हा विचार । माझा कोण अधिकार ।
समर्थासी भार । न कळे कैसा घालावा ॥
गेलें होऊनियां मागें । नये बोलों तें वाउगें ।
पुढिलिया प्रसंगें । तुका म्हणे जाणावें ॥

काय जाणें मी पामर । पांडुरंगा तुझा पार ।
धरिलीया धीर । काय एक न करिसी ॥
उताविळ जालों आधीं । मतिमंद हीनबुद्धि ।
परि तूं कृपानिधि । नाहीं केला अव्हेर ॥
तूं देवाचांही देव । अवघ्या ब्रह्मांडाचा जीव ।
आम्हां दासां कींव । कां भाकणें लागली ॥
तुका म्हणे विश्वंभरा । मी तों पतितचि खरा ।
अन्याय दुसरा । दारीं धरणें बैसलों ॥

नव्हती आली सिसां[1] सुरी । अथवा घाव पाठीवरी ।
तो म्यां केला हरी । एवढा तुम्हां आकांत ॥
वांटिलासी दोहीं ठायीं । मजपाशीं आणि डोहीं ।
लागों दिला नाहीं । येथें तेथें आघात ॥
जीव घेती मायबापें । थोड्या अन्यायाच्या कोपें ।
हें तो नव्हे सोपें । साहों[2] त्वांचि जाणितलें ॥
तुका म्हणे कृपावंता । तुज ऐसा नाहीं दाता ।
काय वाणूं आतां । वाणी माझी कुंठली ॥

तूं माउलीहून मायाळ । चंद्राहूनी शीतळ ।
पाणियाहूनी पातळ । कल्लोळ प्रेमाचा ॥

---

१ शीर, मस्तक. २ सहन करणें.

देऊं काशाची उपमा । दुजी तुज पुरुषोत्तमा ।
ओंवाळूनि नामा । तुझ्यावरुनी टाकिलों ॥
तुवां केलें रे अमृता । गोड त्याही तूं परता ।
पांचां तत्त्वांचा जनिता । सकळ सत्तानायक ॥
कांहीं न बोलोनी आतां । उगाच चरणीं ठेवितों माथा ।
तुका म्हणे पंढरीनाथा । क्षमा करीं अपराध ॥

मी अवगुणी अन्यायी । किती म्हणोन सांगों काई ।
आतां मज पायीं । ठाव देईं विठ्ठले ॥
पुरे पुरे हा संसार । कर्म बळिवंत दुस्तर ।
राहों नेदी स्थिर । एके ठायीं निश्चळ ॥
अनेक बुद्धीचे तरंग । क्षणक्षणा पालटती रंग ।
धरूं जातां संग । तंव तो होतो बाधक ॥
तुका म्हणे आतां । तोडी माझी अवघी चिंता ।
येऊनीयां पंढरिनाथा । वास करी हृदयीं ॥

## २३. कढत पाण्याच्या दाहामुळें तुकारामांनीं भाकिलेली देवाची करुणा.

जळे माझी काया लागला वोणवा[1] । धांवरे केशवा मायबापा ॥
पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन जालें ॥
फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे । पाहतोसी काय हृदय माझें ॥
घेऊनी जीवन धांवें लधलाहीं । कवणाचें कांहीं न चलें येथें ॥
तुका म्हणे माझी तूं होसी जननी । आणीक निर्वाणीं कोण राखे ॥

## २४. देवाच्या कृपेनें दाहशांति.

चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्रही न खाती सर्प तया ॥
विष तें अमृत, आघात तें हित । अकर्तव्य नीत[2] होय त्यासी ॥

१ अग्नि. २ न्यायाचें.

दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतल अग्निज्वाळा ॥
आवडेल जीवा जिवाचिये परी । सकळां अंतरीं एक भाव ॥
तुका म्हणे कृपा केली नारायणें । जाणिजेत येणें अनुभवें ॥

## २५. रामेश्वरभट्टास ज्ञानेश्वरांचें स्वप्न.

माझी मज आली रोकडी प्रचीत । होऊनि फजित दुःख पावे ॥
कांहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं । व्यथा या शरीरीं बहुत झाली॥
ज्ञानेश्वरें मज केला उपकार । स्वप्नीं सविस्तर सांगितलें ॥
तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आम्हां थोर । कां जो अवतार नामयाचा ॥
त्याची तुज कांहीं घडली रे निंदा । म्हणूनि हे बाधा जडली तूज ॥
आतां एक करी सांगेन ते तुला । शरण जाई त्याला निश्चयेंशी ॥
दर्शनेंचि तुझ्या दोषा परिहार । होय तो विचार सांगितला ॥
तोचि हा विश्वास धरोनि मानसीं । जाय कीर्तनासी नित्यकाल ॥
म्हणे रामेश्वर त्याच्या समागमें । झालें हें आराम देह माझें ॥

## २६. रामेश्वरभट्टानें केलेलें तुकारामाचें वर्णन.

पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परी सरी न पवती तुकयाची ॥
शास्त्रही पुराणें गीता नित्यनेम । वाचिताती वर्म न कळे त्यांसी॥
कर्म अभिमानें वर्ण अभिमानें । नाडले[1] ब्राह्मण कलियुगीं ॥
तैसा नव्हे तुका वाणी व्यवसायी। भाव त्याचा पायीं विठोबाचे ॥
अमृताची वाणी वरुषला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ॥
चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां ॥
उत्तम मध्यम कनिष्ठ वेगळे । करूनि निराळे ठेविले ते ॥
भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला ॥
जपतप यज्ञ लाजविलीं दानें । हरिनामकीर्तनें करूनियां ॥

---

१ अडले.

मागें कवीश्वर झाले थोर थोर । नेलें कलेवंर कोणी सांगा ॥
म्हणे रामेश्वर सकळा पुसोनि । गेला तो विमानीं बैसोनियां ॥

२७–२९. तुकारामांचें संतांस स्वचरित्रकथन.

पांडुरंगा करूं प्रथम नमना । दुसरें चरणा संतांचिया ॥
त्यांच्या कृपादानें कथेचा विस्तारु । बाबाजीसद्गुरुदास तुका ॥
काय माझी वाणी मानेल संतांशीं । रंजवूं चित्तासीं आपुलिया ॥
या मनासी लागो हरिनामाचा छंद । आवडी गोविंद गावयासी ॥
सीण झाला मज संसारसंभ्रमें । सीतळ या नामें झाली काया ॥
या सुखा उपमा नाहीं द्यावयासी । आलें आकारासी निर्विकार ॥
नित्य धांवे तेथें नामाचा गजर । घोष जयजयकार आईकतां ॥
तांतडी ते काय हरिगुण गाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥
मूळ नरकाचें राज्य मदें माते । अंतरे बहुत देव दुरी ॥
दुरी अंतरला नामनिंदकासी । जैसें गोचिडासी क्षीर राहे ॥
हे वाट गोमटी वैकुंठासी जातां । रामकृष्णकथा दिंडी ध्वजा ॥
जाणते तयांनीं सांगितलें करा । अहंतेसी वारा आडूनियां ॥
यांसी आहे ठावें परी अंध होती । विषयांची खंती वाटे जना ॥
नाहीं त्या सूटलीं द्रव्य लोभ माया । भस्म दंड छाया तरुवराची॥
चित्त ज्याचें पुत्रपत्नीबंधूवरी । सुटेल हा परी कैसें जाणा ॥
जाणते नेणते करा हरिकथा । तराल सर्वथा भाक माझी ॥
माझी मज असे घडली प्रचित । नसेल पतित ऐसा कोणी ॥
कोणीतरी कांहीं केलें आचरण । मज या कीर्तनेंवीण नाहीं ॥
नाहीं भय भक्ता तराया पोटाचें । देवासी तयाचें करणें लागे ॥
लागे पाठोवाटी पाहे पायांकडे । पीतांबरें खडे वाट झाडी ॥
देकोनियां काय राहिले हे लोक । हेंचि कवतुक वाटे मज ॥

१ शरीर. २ वीणा. ३ विश्वासून, समजून, चिकटून.

जयानें तारिले पाषाण सागरीं। तो ध्या रे अंतरीं स्वामी माझा॥
माझिया जीवाची केली सोडवण। ऐसा नारायण कृपाळू हा॥

ऐका वचन हे संत। मी तों आगळा पतित।
काय काजे प्रीत। करीतसां आदरें॥
माझें चित्त मज ग्वाही। सत्य तरलों मी नाहीं।
एकांचिये वाहीं[1]। एक देखी मानिती॥
बहु पीडिलों संसारें। मोडी पुंसें[2] पिटी ढोरें।
न पडतां पुरें। या विचारें राहिलों॥
सहज सरलें होतें कांहीं। द्रव्य थोडें बहु तेंही।
त्याग केला नाहीं। दिलें द्विजा याचकां॥
प्रियापुत्रबंधु। यांचा तोडिला संबंधु।
सहज जालों मंदु। भाग्यहीन करंटा॥
तोंड न दाखवे जना। शिरें सांदीं[3] भरे राना।
एकांत तो जाणा। तयासाठीं लागला॥
पोटें पिटिलें[4] काहारें। दया नाहीं या विचारें।
बोलावितां बरें। सहज म्हणे यासाठीं॥
सहज वडिलां होती सेवा। म्हणोनि पूजितों या देवा।
तुका म्हणे भावा। साठीं झणीं घ्या कोणी॥

याती शूद्र वंश केला वेवसाव[5]। आदि तो हा देव कुळपूज्य॥
नये बोलों परि पाळिलें वचन। केलियाचा प्रश्न तुम्हीं संतीं॥
संवसारें जालों अति दुःखें दुःखी। मायबाप सेखीं क्रमिलिया[6]॥
दुष्काळें आटिलें द्रव्य नेला मान। स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली।
लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें। वेवसाव देखें तुटी येतां॥

---

१ प्रवाह, गति. २ पुछ, शेंपूट. ३ फट, कोंपरा. ४ काहुर, भय, भ्रांति.
५ कुळाचा धंदा. ६ दिवंगत झाल्यावर.

देवाचें देऊळ होतें, तें भंगलें। चित्तासी जें आलें करावेंसें ॥
आरंभीं कीर्तन करीं एकादशी। नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥
कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें। विश्वासें आदरें करोनियां ॥
गाती पुढें त्यांचें धरावें ध्रुपद। भावें चित्त शुद्ध करोनियां ॥
संतांचें सेविलें तीर्थ पायवणी[1]। लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥
ठाकला[2] तो कांहीं केला उपकार। केलें हें शरीर कष्टवूनी ॥
वचन मानिलें नाहीं सुहृदांचें। समूळ प्रपंचें वीट आला ॥
सत्यअसत्यासीं मन केलें ग्वाही। मानियेलें नाहीं बहुमत ॥
मानियेला स्वामी गुरूचा उपदेश। धरिला विश्वास दृढ नामीं ॥
यावरी या झाली कवित्वाची स्फूर्ति। पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥
निषेधाचा कांहीं पडिला आघात। तेणें मध्यें चित्त दुखावलें ॥
बुडविल्या वह्या बैसलों धरणें। केलें नारायणें समाधान ॥
विस्तारीं सांगतां बहुत प्रकार। होईल उशीर आतां पुरे ॥
आतां आहे तैसा दिसतो विचार। पुढील प्रकार देव जाणे ॥
भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा। कृपावंत ऐसा कळों आलें ॥
तुका म्हणे माझें सर्व भांडवल। बोलविले बोल पांडुरंगें ॥

२०. देवास आपलें सामर्थ्य दाखविण्याबद्दल तुकारामांची विनंति.

अशक्य तें तुम्हां नाहीं नारायणा। निर्जीवा चेतना आणावया ॥
मागें काय जाणों स्वामीचे पवाडे। आतां कां रोकडे दावूं नये ॥
थोर भाग्य आम्ही समर्थाचे कांसे। म्हणवितों दास काय थोडें ॥
तुका म्हणे माझे निववावे डोळे। दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥

३१–३३. परचक्राच्या आक्रांतांत केलेली देवाची करुणा.

न देखवे डोळां ऐसा हा आकांत[3]। परपीडें चित्त दुःखी होतें ॥
काय तुम्ही येथें नसालसें जालें। आम्ही न देखिलें पाहिजे हें ॥

---

१ चरणोदक. २ सांपडला, घडला. ३ हल्ला.

परचक्र कोठें हरिदासाच्या वासें । न देखिजेत देशें रहातिया ॥
तुका म्हणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें जालें ॥

भीत नाहीं आतां आपुल्या मरणा । दुःखी होतां जना न देखवे ॥
आमची तों जाती ऐसी परंपरा । कां तुम्ही दातारा नेणां ऐसें ॥
भजनीं विक्षेप[1] तेंची पैं मरण । न वजावा क्षण एक वायां ॥
तुका म्हणे नाहीं आघाताचा वारा । ते स्थळीं दातारा ठाव मागे ॥

काय म्यां मानावें हरिकथेचें फळ । तरिजे सकळ जन ऐसें ॥
उच्छेद तो असे हा गे आरंभिला । रोकडें विठ्ठला परचक्र ॥
पापाविण नाहीं पाप येत पुढें । साक्षीसी रोकडें साक्ष आलें ॥
तुका म्हणे जेथें वसतील दास । तेथें तुझा वास कैसा आतां ॥

३४. साधूची समलोष्टाश्मकांचनता.

मुंगी आणि राव । आम्हां सारखाचि जीव ॥
गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा[2] ॥
सोनें आणि माती । आम्हा समान हें चित्तीं ॥
तुका म्हणे आलें । घरा वैकुंठ सगळें ॥

३५-४१. ज्ञानेश्वरांच्या दृष्टांतामुळें आलेल्या ब्राह्मणास तुकारामांचा उपदेश.

नको कांहीं पडों ग्रंथाचिये भरीं । शीघ्र व्रत करीं हेंचि एक ॥
देवाचिये चाडे आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनियां ॥
साधनें घालितीं काळाचिये मुखीं । गर्भवास सेखीं न चुकती ॥
उधाराचा मोक्ष होय नोहे ऐसा । पतनासी इच्छा आवश्यक ॥

---

१ आघात, अंतराय. २ पाश.

रोकडी पातली अंगसंगें जरा । आतां उजगरा[1] कोठवरी ॥
तुका म्हणे घालीं नामासाठीं उडी । पांडुरंग थडी पाववील ॥

नाहीं देवापाशीं मोक्षाच गांठोडें । आणूनी निराळें द्यावें हातीं ॥
इंद्रियांचा जय साधूनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥
उपास पारणीं अक्षरांची अटी[2] । सत्कर्मी शेवटीं असे फळ ॥
आदरें संकल्प वारीं अतिशय । सहज तें काय दुःख जाण ॥
स्वप्नींच्या घायें विवळसी वायां । रडे रडतियासवें मिथ्या ॥
तुका म्हणे कळ आहे मुळापाशीं । शरण देवासी जाय वेगीं ॥

त्यजिलें भेटवी आणूनी वासना । दाविल्याचें जना काय काज ॥
आळवावा देवा भाकूनी करुणा । आपुलिया मना साक्ष करीं ॥
नाहीं जावें यावें दुरूनी लागत । आहे साक्षभूत अंतरींच ॥
तुका म्हणे हा आहे कृपासिंधु । तोडी भवबंधु तात्काळिक ॥

गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥
मग गोविंद तें काया । भेद नाहीं देवा तया ॥
आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥
तुका म्हणे आळी । जेंवीं नुरेचि वेगळी ॥

संकोचोनि काय झालासी लहान । घेईं आपोशन ब्रम्हांडाचें ॥
करोनी पारणें आंचवे संसारा । उशीर उशिरा लावूं नको ॥
घरकुलानें होता पडिला अंधार । तेणें केलें फार कासावीस ॥
झुगारूनी दुरीं लपविलें कांखे । तुका म्हणे वांखे[4] कौतुकाचे ॥

ज्ञानियांचा राजा गुरु महाराज । म्हणती ज्ञानदेव ऐसें तुम्हां ॥
मज पामरा हें काय थोरपण । पायींची वहाण पायीं बरी ॥

---

१ जागृति. २ खटपट, श्रम. ३ वर्म. ४ चमत्कार, चेष्टा.

ब्रम्हादिक जेथें तुम्हां वोळंगणे । इतर तुळणे काय पुरे ॥
तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली । म्हणोनि ठेविली पायीं डोई॥

बोलिलीं लेकुरें । वेडीं वांकुडीं उत्तरें ॥
करा क्षमा अपराध । महाराज तुम्हीं सिद्ध ॥
नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ॥
तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें[२] किंकरा ॥

४२. निर्याणप्रसंगीं गरुडासमवेत देवाचें दर्शन.

पैल आले हरि । शंखचक्र शोभे करीं ॥
गरुड येतो फडत्कारें । ना भी ना भी म्हणे त्वरें ॥
मुगुटकुंडलांच्या दीप्ति । तेजें लोपला गभस्ति ॥
मेघश्यामवर्ण हरि । मूर्ति डोळस साजिरी ॥
चतुर्भुज वैजयंती । गळां माळ हे [३]रुळती ॥
पीतांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥
तुका झालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठ ॥

४३. तुकारामांचें निर्याण.

आम्हीं जातों तुम्हीं । कृपा असों द्यावी ।
सकळां सांगावी । विनंती माझी ॥
वाढवेळ झाला । उभा पांडुरंग ।
वैकुंठा श्रीरंग । बोलावितो ॥
अंतकाळीं विठो । आम्हांसी पावला ।
कुडीसहित झाला । गुप्त तुका ॥

---

१ सेवा करणारे, आश्रय करणारे. २ पायांशीं. ३ शोभा देत हालणें.

# २ तुकारामांची साधकदशा.

## ४४. आळसाला व लज्जेला येथून रामराम.

आतां येथें झाली जीवा संवसाटी । होतें तैसें पोटीं फळ आलें ॥
आतां धरिले ते न सोडी चरण । सांपडलें धन निज ठेवा ॥
आतां हा आळस असो परता दुरी । नेदावी ते उरी उरों कांहीं ॥
आतां याचा मज न व्हावा विसर । भरोनि अंतर राहो रूप ॥
आतां लोकलाज नयो येथें आड । बहु झाला गोड ब्रम्हरस ॥
तुका म्हणे आतां जन्म हा सफळ । अंतरीं गोपाळ स्थिरावला ॥

## ४५. निंदा व स्तुति यांची समता.

फजितखोरा मना किती तुज सांगों । नको कोणा लागों मागें मागें ॥
स्नेहवादें दुःख जडलेंसे अंगीं । निष्ठुर हें जगीं प्रेमसुख ॥
निंदास्तुति कोणी करो दयामाया । न धरीं चाड या सुखदुःखा ॥
योगिराज कां रे न राहती बैसोनी । एकिये आसनीं याचि गुणें ॥
तुका म्हणे मना पाहे विचारून । होईं रे कठीण वज्रापेसें ॥

## ४६. उपचाराचा कंटाळा.

उपचाराशी वाजें जालों । नका बोलों यावरी ॥
असेल तें असो तैसें । भेटीसरिसें नमन ॥
दुसऱ्यामध्यें कोण मिळे । छंद चाळे बहु मतें ॥
एकाएकीं आतां तुका । लौकिका या बाहेरी ॥

---

१ मोबदला. २ कंटाळलों, त्रासलों. ३ नाद. ४ वेड.

### ४७. फकीराच्या स्थितींतच देवाची आठवण होते.

नको देऊं देवा पोटीं हें संतान[१] । मायाजाळें जाण नाठवसी ॥
नको देऊं देवा द्रव्य आणि भाग्य । तो एक उद्वेगें[२] होय जीवा ॥
तुका म्हणे करीं फकिराचे परी । रात्रंदिवस हरि येईल वाचे ॥

### ४८. " आपदः सन्तु नः शश्वद्यासु संस्मर्यते हरिः "

न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥
ऐशी माझी वाचा मन उपदेशी । आणीक लोकांसी हेंचि सांगे ॥
विटंबो[३] शरीर होत कां विपत्ती । परि राहो चित्तीं नारायण ॥
तुका म्हणे नाशिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तेंचि हित ॥

### ४९. देहावर उदासीनता.

पिंड[४] पोसावें हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनियां ॥
शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयांचिया ॥
क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं ॥
कर्वतिलीं[५] देहें कापियेलें मांसा । गेले वनवासा शुकादिक ॥
तुका म्हणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी एक पाव जळे ॥

### ५०. जरा व मृत्यूचें भय.

जरा कर्णमूळीं[६] सांगों आली गोष्टी । मृत्याचिये भेटी जवळी आली ॥
आतां माझ्या मना होई सावधान । ॐ पुण्याची जाण कार्यसिद्धि ॥
शेवटील घडी बुडतां नलगे वेळ । साधाया तो काळ जवळी आला ॥
तुका म्हणे चिंतीं कुळींची देवता । वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥

---

१संतति, मुलें. २काळजी. ३फजिती होणें. ४शरीर. ५ कर्वतीनें कापणें. ६कानाशीं.

### ५१. एकमेकांचीं दहनें पाहून कां सावध होत नाहीं ?

एक पाहतसां एकांची दहनें । सावध त्या गुणें[1] कां रे न व्हा ॥
मारा हाक देवा भय अट्टाहासें । जंव काळाऐसें झालें नाहीं ॥
मरणाची तंव गांठोडी पदरीं । जिणें तोंचि वरि माप भरे ॥
तुका म्हणे धीग[2] वाहती मारग । अंगा आलें मग हालों नेदी ॥

### ५२. पलीकडच्या घरीं चोरी झालेली पाहून उरलें तें जतन करा.

पैल घरीं झाली चोरी । देहा करी बोंब ॥
हाबा हांबा[3] करिसी काय । फिराऊनि नेट्यां[4] वाय ॥
सांडुनियां शुद्धी[5] । निजलासी गेली बुद्धि ॥
चोरी तुझा काढिला बुर[6] । वेगळें भावा घातलें दूर ॥
भलतियासी देसी वावं[7] । लाहोसि तूं एवढा ठाव ॥
तुका म्हणे अझुनि तरी । उरलें तें जतन करीं ॥

### ५३. मरणाचें स्मरण असावें.

वाटे या जनाचें थोर वा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥
कोण दम[8] ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥
काय मानुनियां राहिले निश्चिंती । काय जाब[9] देती यमदूतां ॥
कां हे विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥
काय हातीं नाहीं करील तयासी । काय झालें यांसी काय जाणों ॥
कां हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनिया ॥
काय मोल यासी लाभे धन वित्त । कां हे यांचें चित्त घेत नाहीं ॥
तुका म्हणे कां हीं भोगतील खाणी[10] । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥

---

१ मुळें. २ धिःकार असो. ३ हायहाय. ४ नेटानें. ५ जागृति. ६ भुःसा. ७ अवकाश जागा. ८ विश्वास. ९ उत्तर. १० जन्म.

### ५४. एका चक्रपाणीवांचून बायकापोरें व्यर्थ होत.

जन हे सुखाचें दिल्याघेतल्याचें । अंत हे काळींचें नाहीं कोणी ॥
झाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनिया पळती रांडापोरें ॥
बाईल म्हणे खर मरता तरी बरें । नासिलें हें घर थुंकोनियां ॥
तुका म्हणे माझीं नव्हतील कोणी । तुज चक्रपाणिवांचूनियां ॥

### ५५. काळाच्या उडीपासून एका देवावांचून सोडविता कोणी नाहीं.

नको नको मना गुंतूं मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ॥
काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां मायबाप ॥
सोडविना राजा देशींचा चौधरी[2] । आणीक सोइरीं भलीं भलीं ॥
तुका म्हणे तुला सोडविना कोणी । एका चक्रपाणीवांचूनिया ॥

### ५६. हें शरीरच चिंतामणि आहे.

सकळ चिंतामणी[3] शरीर । जरी जाय अहंकार समूळ आशा ॥
निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धि । निर्मळ स्फटिक जैसा ॥
मोक्षाचें तीर्थ नलगे वाराणसी[4] । येतीं तयापाशीं अवघीं जनें ॥
तीर्थांसी तीर्थ झाला । एक तोचि मोक्ष तेणें दर्शनें ॥
मन शुद्ध तया काय करिसी माळा । मंडित सकळां भूषणांसी ॥
हरिच्या गुणें गर्जताती सदा । आनंद तयां मानसीं ॥
तन मन धन दिलें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची ॥
तुका म्हणे तो परिसाहूनि आगळा । काय महिमा वर्णूं त्याची ॥

### ५७. या जन्माच्या साधनानें सच्चिदानंद पदवी प्राप्त होते.

इहलोकींचा हा देहे । देव इच्छिताती पाहे ॥
धन्य आम्हीं जन्मा आलों । दास विठोबाचे झालों ॥

---

१ गाढव. २ गांवांतील अधिकारी. ३ चिंतिलेलें देणारें रत्न. ४ काशी.

आयुष्याच्या या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें ॥
तुका म्हणे पावटणी[१] । करूं स्वर्गाची निशाणी ॥

५८. देह कोणत्याही स्थितींत असला तरी देवाचें चिंतन करावें.

आतां केशीराजा हेचि विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥
देह असो माझा भलतियेठायीं । चित्त तुझ्या पायीं असों द्यावें ॥
काळाचें खंडन घडावें चिंतन । तनमनधनाविन्मुखता ॥
कफवातपित्त देहअवसानीं[२] । ठेवावीं वारूनि[३] दुरितें[४] हीं ॥
सावध तों माझीं इंद्रियें सकळ । दिली एक वेळ हांक आधीं ॥
तुका म्हणे तूं या सकळांचा जनिता । येथें ऐक्यता सकळांसी ॥

५९. आपआपल्या व्यवसायांत देवाकडे ओढ.

करीं धंदा परि आवडती पाय । प्रीती सांगों काय नेणां देवा ॥
रूप डोळां देखें सदा सर्वकाळ । संपादितों आळ प्रपंचाचा ॥
नेमून ठेविली कार्याकारणीं । आमुचि हे वाणी गुण वदे ॥
मनासीं उत्कंठा दर्शनाचा हेवा । नाहीं लोभ जीवा धन धान्य ॥
उसांतितों[५] पंथ[६] वेठीचिया[७] परी । जीवनसूत्र दोरीपाशीं ओढे ॥
तुका म्हणे ऐसें करितों निर्वाण[८] । जीव तुम्हां भिन्न नाहीं माझा ॥

६०. देव सांपडण्याची कळा.

विठो सांपडावया हातीं । ठावी झाली एक गती[९] ।
न धरी भय चित्तीं । बळ किती तयाचें ॥
लागे आपणचि हातीं । कींव भाकावी काकुलती ।
करी मग चित्तीं । असेल तें तयाचें ॥

---

१ पायरी. २ शेवट. ३ नाहींसें करणें. ४ पातक. ५ आक्रमण करणें. ६ मार्ग. ७ बेगारी. ८ अखेर, शेवटचा, निश्चय. ९ युक्ति.

एकलिया भावबळें। कैं सांपडे तो काळें।
वैष्णवांच्या मेळें। उभा ठाके हांकेसी॥
बांधा माझिया जीवासी। तुका म्हणे प्रेमपाशीं।
न सोडी तयासी। सर्वस्वासी उदार॥

६१. देवापेक्षां भाव विस्तृत केला पाहिजे.

जेथें जेथें जासी। तेथें मजचि तूं पाहसी॥
ऐसा पसरीन भाव। रिता नाहीं कोणी ठाव॥
चित्त ज़डलें पायीं। पाळती हें ठायीं ठायीं॥
तुका म्हणे पोटीं। देव घालुनि सांगे गोष्टी॥

६२. देवाचें चिंतन हीच त्याची सेवा.

तुझें वर्म ठावें। माझ्या पाडियेलें भावें॥
रूप कासवाचे परी। धरुनि राहिलों अंतरीं॥
नेदी होऊं तुटी। मेळवीन दृष्टादृष्टी॥
तुका म्हणे देवा। चिंतन हें तुझी सेवा॥

६३. हरिनामवेलींवर मनानें पक्षिराज बनलें पाहिजे.

हरिनामवेली पावली विस्तार। फळीं पुष्पीं भार वोल्हावली[1]॥
तेथें माझ्या मना होईं पक्षिराज। साधावया काज[2] तृप्तीचें[3] या॥
मुळींचिया बीजें दाखविली गोडी। लवकराचि जोडी झालियाची॥
तुका म्हणे क्षणक्षणां जातो काळ। गोडी ते रसाळ अंतरेल॥

६४. अनुभविक संतांच्या भेटीबद्दल तळमळ.

माझिये जातीचे मज भेटो कोणी। आवडीची[4] धणी फेडावया॥
आवडे ज्या हरी अंतरापासूनि। ऐसियांचे मनीं आर्त माझें॥

---

१ ओंलावणें, भारावणें. २ कार्य. ३ तृप्ति. ४ उत्कट इच्छा.

तयालागी जीव होतो कासावीस । पाहातील[1] वास नयन हे ॥
सुफळ[2] हा जन्म होईल तेथून । देतां आलिंगन वैष्णवांसी ॥
तुका म्हणे तोचि सुदिन सोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरि ॥

## ६५. ज्ञानी लोकांचे घरीं केवळ अहंभाव असतो.

ज्ञानियांचे घरीं चोजवितां[3] देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥
म्हणउनि अवघे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥
वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकांमधीं ॥
पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा विपरीत ॥
आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । करती रागें गुरगुरु ॥
तुका म्हणे मज कोणाचा पांगिला[4] । नको बा विठ्ठला करूं आतां ॥

## ६६. संतांचा परिवार होण्याची अपेक्षा.

होईन खडे गोटे । चरणरज सोने मोठे ।
पंढरीचे वाटे । संतचरणीं लागेन ॥
आणीक कांहीं दुजें । मी मागे न तुजपाशीं ।
आठवितां सुख । भय नास नाहीं ज्यासी ॥
होईन मोचे[6] वाहाणा । पायीं सकळां संतजनां ।
मांजर सुकर[7] सुणीं । जवळी शेष घ्यावया ॥
सांडोवा[9] पायरी । वाहळ[10] बावी[11] गंगातीरीं ॥
होईन तयावरी । संतसज्जन चालती ॥

---

१ वाट. २ सफल. ३ शोध करणें, तपास करणें. ४ अंकित. ५ लहान. ६ जोडे. ७ डुक्कर. ८ कुत्रें. ९ पाण्यावरून पलीकडे जाण्याकरतां घातलेला दगडाचा बांध, अथवा पूल. १० ओहोळ. ११ विहीर.

लागे संतापायीं । ऐसा ठेवीं भलते ठायीं ।
तुका म्हणे देई[1] । धाक नाहीं जन्माचा ॥

६७. संतांच्या उपकाराची फेड करितां येणें शक्य नाहीं.

काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥
काय द्यावें त्यांशीं व्हांवें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥
सहज बोलणें हित उपदेश । करुनि सायास[2] शिकविती ॥
तुका म्हणे वत्स धेनुवेचे चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥

६८. मागच्या भयानें तुकाराम जागृतीस येतात.

क्षणक्षणां सांभाळितों । साक्षी होतो आपुला ॥
न घडावी पायीं तुटी[3] । मनें मिठी घातली ॥
विचार तो वचनाआधीं । धरूनि शुद्धि ठेविली ॥
तुका म्हणे मागें भ्यालों । तरी झालों जागृत ॥

---

१ ऋणांतून मुक्त होणें. २ कष्ट. ३ वियोग.

# ३ तुकारामांच्या अंतःकरणांतिल तळमळ.

६९. तुझी मला भेट झाली नाहीं असें माझें अंतःकरण मला सांगतें.

बेगडाचा रंग राहे कोण काळ । अंगें हें पितळ न देखतां ॥
माझें चित्त मज जवळीच [1]ग्वाही । तुझी मज नाहीं भेटी ऐसें ॥
दासी[2]सुतां नाहीं पितियाचा ठाव । अवघेंचि [3]वावें सोंग त्याचें ॥
तुका म्हणे माझी केली विटंबना । अनुभवें जना येईल कळों ॥

७०. अनुभवावांचून मी कसा आनंद मानूं ?

आतां तुझा भाव कळों आला देवा । [4]ठकूनियां सेवा घेसी माझी ॥
टाकूनि [5]सांकडें आपुलिया माथां । घातला या संतांवरी भार ॥
स्तुति करवूनि पिटिला [6]डांगोरा । तें कोण दातारा साच करी ॥
जातीनें वाणी मी पोटींचें हे [7]कुडें । नका मजपुढें [8]ठकाठकी ॥
तुका म्हणे नाहीं आलें अनुभवा । आधींच मी देवा कैसा नाचूं ॥

७१. स्वप्नीं सुध्दां तुझें दर्शन नाहीं.

स्वप्नीं तोहीं कैसा न पडसी डोळां । सुंदर सांवळा [9]घवघवीत ॥
चतुर्भुज माळा [10]रुळे एकावळी । कस्तुरी [11]निढळीं रेखिलीसे ॥
शंखचक्रगदा रुळे वैजयंती । कुंडलें [12]तळपतीं श्रवणीं दोन्हीं ॥
तुका म्हणे स्वप्नीं आतां दावीं पाय । पांडुरंगे माय कृपावंते ॥

---

१ साक्षी. २ वेश्येचा मुलगा. ३ व्यर्थ. ४ फसवून. ५ संकट. ६ दौंडी. ७ वाकडें, कपटी. ८ फसवेगिरी. ९ शोभिवंत, ठळक. १० शोभा देत हालणें. ११ कपाळ. १२ चमकणें.

७२. माझे कोणते लळे तूं आजपर्यंत पाळिले आहेस ?

जे केली आळी ते अवघी गेली वायां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥
काय समाधान केलें कोण वेळे । कोण माझे लळे पाळियेले ॥
आभासही नाहीं स्वप्नीं दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां काय चिंता ॥
आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसे जगामाजी झाले ॥
तुका म्हणे आतां नाहीं भरंवसा । मोकलीसी[2] ऐसा वाटतोसी ॥

७३. तुझें चतुर्भुज रूप पाहिल्यावांचून मला धीर धरवत नाहीं.

लोकमान देहसुख । संपत्तिउपभोग अनेक ।
विटंबनादुःख । तुझिये भेटीवांचूनि ॥
तरि मज ये भेट ये भेट । काय ठाकलासी नीट ।
थोर पुण्यें वाट । तुज दैवेंचि लाधली ॥
काय ब्रह्मज्ञान करूं कोरडें । रितें[3] मायेचें मापाडें ।
भेटीविण कुडें । तुझिया अवघें मज वाटे ॥
आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा उद्धार ।
न देखतां धीर । चतुर्भुज मज नाहीं ॥
रिद्धिसिद्धि काय करूं । अथवा आगमविचारु[4] ।
भेटीविण भारु । तुझिया वाटे मज याचा ॥
तुजवांचूनि कांहीं व्हावें । ऐसें नको माझिया जीवें ।
तुका म्हणे द्यावें । दरुषण पायांचें ॥

७४. तुझें रूप अपार असलें तर मला सान रूप दाखीव.

आम्ही जाणावें तें काई । तुझें वर्म कोणे ठायीं ॥
अंतपार नाहीं । ऐसें श्रुति बोलती ॥

---

१ हट्ट. २ सोडणें, हांकलणे. ३ पोकळ. ४ शास्त्र.

होई मज तैसा मज तैसा । [१]साना सकुमार हृषीकेशा ।
पुरवीं माझी आशा । भुजा चारी दाखवीं ॥
खालता सप्तही पाताळा । वरता स्वर्गाहूनि ढिसाळा[२] ।
तो मी मशकें[३] डोळां । कैसा पाहों आपुल्या ॥
मज असे हा भरंवसा । पढियें[४] होसी तयां तैसा ।
पंढरीनिवासा । तुका म्हणे गा विठोबा ॥

७५. उध्द्वअक्रूरादिकांस जें रूप तूं दाखविलेंस तेंच मला दाखीव.

उद्धवअक्रुरांशीं । आणीक व्यासअंबऋषी ।
रुक्मांगदप्रल्हादांशीं । दाविलें तें दाखवीं ॥
तरि मी पाहेन पाहेन । तुझे श्रीमुखचरण ।
उताविळ मन । तयाकारणें तेथें ॥
जनकश्रुतदेवा करीं । कैसा शोभलासी हरी ।
विदुराच्या घरीं । कण्या धरी कवतुकें ॥
पांडवां आकांतीं । तेथें पावसी स्मरतीं ।
घातलें द्रौपदी- । लागीं बिरडें[५] चोळीचें ॥
करी गोपींचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख
दावी तेंचि मुख । दृष्टी माझ्या आपुलें ॥
तरि तूं अनाथाचा दाता । मागतियां शरणागतां ।
तुका म्हणे आतां । कोडें[६] पुरवीं हें माझें ॥

७६. तुझें दर्शन झाल्यावर मी तुझ्याशीं संभाषण करीन.

भावबळें कैसा झालासी लहान । मागें संतीं ध्यान वर्णियेलें ॥
तें मज उचित करूनियां देवा । दाखवी केशवा मायबापा ॥

---

१ लहान. २ प्रचंड. ३ चिलिट. ४ आवडतें. ५ गांठ. ६ इच्छा.

पाहोनियां डोळां बोलेन मी गोष्टी । आलिंगूनि मिठी देईन पायीं ॥
चरणीं दृष्टी उभा राहेन समोर । जोडोनियां कर पुढें दोन्ही ॥
तुका म्हणे उत्कंठित हे वासना । पुरवी नारायणा आर्त माझें ॥

७७. जें रूप कानांनीं ऐकिलें तें रूप प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहावें अशी माझी इच्छा आहे.

तुजलागीं माझा जीव झाला पिसा[1] । अवलोकितों दिशा पांडुरंगा ॥
सांडिला व्यवहार माया लोकाचार[2] । छंद[3] निरंतर हाचि मनीं ॥
आइकिलें कानीं तें रूप लोचन । देखावया सीण करिताती ॥
प्राण हा विकळ[4] होय कासावीस । जीवनाविण[5] मत्स्य तयापरी ॥
तुका म्हणे आतां कोण तो उपाव । करूं तुझे पाव आतुडे[6] तो ॥

७८. तूं कोठें तरी भक्तिसुखांत गुंतला असशील.

कोठें गुंतलासी कोणाच्या धांवया[7] । आली देवराया निद्रा तुज ॥
कोठें गुंतलासी भक्तिप्रेमसुखें । न सुटती मुखें गोपिकांचीं ॥
काय पडिलें तुज कोणाचें संकट । दुरी पंथ वाट न चालवे ॥
काय माझे तुज गुण दोष दिसती । म्हणोनि श्रीपति कोपलासि ॥
काय झालें सांग माझिया कपाळा[8] । उरला जीव डोळां तुका म्हणे ॥

७९. मला तुझ्या रूपाचा दुष्काळ पडला आहे.

दुष्काळें अन्नें पीडिलें क्षुधार्थी । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥
तैसें तुझे पायीं लांचावलें मन । झुरे[9] माझा प्राण भेटावया ॥
मांजरें देखिला लोणियाचा गोळा । लावुनियां डोळा बैसलेंसे ॥
तुका म्हणे आतां झोंडी[10] घालूं पाहे । पांडुरंगे माये तुझे पायीं ॥

---

१ वेडा. २ लोकव्यवहार. ३ वेड. ४ विव्हळ. ५ पाणी ६ प्राप्त होणें. ७ करुणा भाकणें. ८ नशीब. ९ संवकणें. १० उडी

८०. पाण्याबाहेर टाकिलेल्या माशाप्रमाणें मी तळमळत आहे.

कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनि पाहे ॥
तैसें झालें माझ्या जिवा । केव्हां भेटसी केशवा ॥
चुकलिया माये । बाळ हुरूहुरू[1] पाहे ॥
जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥

८१. एका क्षणाचीहि विश्रांति न घेतां तुझें रूप मला अनुभवितां येईल काय ?

कई ऐसी दशा[2] येईल माझ्या अंगा । चित्त पांडुरंगा झुरतसे ॥
नाठवूनि देह पायांचें चिंतन । अवसान ते क्षण नाहीं मध्यें ॥
कई ऐसा पात्र होईन लाभासी । नेणों हृषीकेशी तुष्टतील ॥
तुका म्हणे धन्य मानीन संचित । घेईन तें नित्य प्रेमसुख ॥

८२. मजवर देव कृपा करील काय हें मजला कोण सांगेल ?

पुसावेंसें हेंचि वाटे । जें जें भेटे तयासी ॥
देव कृपा करील मज । काय लाज राखील ॥
अवघियांचा विसर झाला । हा राहिला उद्योग ॥
तुका म्हणे चिंता वाटे । कोण भेटे सांगेसें ॥

८३. तूं मला सोडलेंस तर मी वायांच गेलों असें समज.

आतां मी अनन्य येथें अधिकारी । होइन कोणे परी[3] नेणों देवा ॥
पुराणींचे अर्थ आणितां मनास । होय कासाविस जीव माझा ॥
इंद्रियांचीं आम्हीं पांगिलों[4] अंकितें । त्यांचे रंगें चित्त रंगलेंसे ॥
एकाचेंही मज न घडे दमन । अवघींच नेमून कैसीं राखों ॥
तुका म्हणे जरी मोकलिशी आतां । तरी मी अनंता वायां गेलों ॥

१ चुटपुट. २ स्थिति. ३ प्रकार. ४ स्वाधीन.

प्रपंचाबाहेरी नाहीं आलें चित्त । केलें करी नित्य वेवसाय[1] ॥
तुका म्हणे मज भोरप्याचि[2] परी । झालें सोंग वरी आंत तैसें ॥

### ९२. माझ्या पापास तर सीमाच नाहीं.

माझिया मीपणावरी पडो पाषाण । जळो हें भूषण नाम माझें ।
पापा नाहीं पार दुःखाचे डोंगर । झालों ये भूमीसीं ओझें ॥
काय विटंबना सांगों किती । पाषाण फुटती ऐसें दुःख ।
नरनारी सकळ उत्तम चांडाळ । न पाहती डोळां माझें मुख ॥
काया वाचा मनें अघटित करणें । चर्म चक्षु हात पाय ।
निंदा द्वेष घात विश्वासीं व्यभिचार । आणीक सांगों किती काय ॥
लक्ष्मीमदें मातें घडले महा दोष । पत्नी दोनी भेदाभेद ॥
पितृवचनीं घडली अवज्ञा अविचार । कुटिल कुचरें[3] वादी निंद्य ॥
आणीक किती सांगों ते अवगुण । न वळे जिव्हा कांपे मन ॥
भूतदया उपकार नाहीं शब्दा धीर । विषयीं लंपट शब्दहीन ॥
संत महानुभाव ऐका हें उत्तर । अवगुण आविचार वृद्धि पापा ॥
तुका म्हणे सरते[4] करा पांडुरंगीं । शरण आलों मायबापा ॥

### ९३. माझ्या अधर्माचरणांतून तरण्यास तुझीच कृपा पाहिजे.

मी तंव अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंदबुद्धि ॥
तुज म्यां आठविलें नाहीं कधीं । वाचे कृपानिधि मायबापा ॥
नाहीं ऐकिलें गाईलें गीत । धरिली लाज सांडिलें हित ॥
नावडे पुराण बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥
नाहीं केला परउपकार । नाहीं दया आली पीडितां पर[5] ॥
करूं नये तो केला व्यापार । वाहिला भार कुटुंबाचा ॥

---

१ व्यवहार. २ बहुरूपी. ३ कपटी, अंगचोर. ४ अर्पण, मान्य. ५ दुसरा.

नाहीं केलें तीर्थांचें भ्रमण । पाळिला पिंड[1] करचरण॥
नाहीं संतसेवा घडलें दान । पूजावलोकन मूर्तीचें ॥
असंगसंगें घडले अन्याय । बहुत अधर्मउपाय ॥
न कळे हित करावें तें काय । नये बोलूं आठवूं तें ॥
आपें[2] आपण्या घातकर । शत्रु झालों मी दावेदार ॥
तूं तंव कृपेचा सागर । उतरी पार तुका म्हणे ॥

९४. पापाच्या अतिरेकामुळें तुझें दर्शन होत नाहीं.

तळमळें चित्त दर्शनाची आशा । बहु जगदीशा करुणा केली ॥
वचनींच संत पावले स्वरूप । माझें नेदी पाप योगा येऊं ॥
वेठीऐसा[3] करीं भक्तिवेवसाव । न पवेचि जीव समाधान ॥
तुका म्हणे कई देसील विसांवा । पांडुरंगीं धांवा घेतें मन ॥

९५ माझा जन्म मला बिगारीप्रमाणें वाटत आहे.

आवडी धरूनि करूं गेलों लाड । भक्ति प्रेमकोड न पुरेचि ॥
म्हणऊनि जीव ठेला आसांवोनि[4] । खेद होतो मनीं बहुसाल[5] ॥
वेठीऐसें वाटे निर्फळ[6] कारण । शीतळ होऊन खोडांवलों[7] ॥
तुका म्हणे सरते[8] नव्हेचि पायांपें । बळ केलें पापें नव्हेचि भेटी ॥

९६. तुला देहभाव समर्पूनही माझ्या चित्तांत दोषवृत्ति कां उत्पन्न होते?

कां जी आम्हां होतें दोषांचें दर्शन । तुज समर्पून देहभाव ॥
पांडुरंगा कृपाळूवा दयावंता । धरिशील सत्ता सकळही ॥
कां जी आम्हांवरि आणिकांची सत्ता । तुम्हांसी असतां जवळिकें॥
तुका म्हणे पायीं केलें निवेदन । उचित तें दान करीं सत्ता ॥

१ शरीर. २ आपण आपला. ३ बिगारी. ४ उत्सुक होऊन. ५ फार. ६ निष्फळ. ७ लुळा होणें. ८ मान्य.

## ९७. माझे गुणदोष विचारूंच नकोस.

आतां गुण दोष काय विचारिसी । मी तों आहें रासी पातकांची॥
पतितपावनासवें समागम । आपुलाला धर्म चालविजे ॥
घणघार्यीं[1] भेटी लोखंड परिसा । तरी अनारिसा[2] न पालटे ॥
तुका म्हणे माती कोण पुसे फुका । कस्तुरीच्या तुका समागमें ॥

## ९८. दोष करणें हें माझें काम, पण तारणें हें तुझें काम आहे.

आतां नको चुकों आपुल्या उचिता । कृपाळुवा कांतां रखुमाईच्या ॥
आचरावे दोष हें आम्हां उचित । तारावे पतित तुमचे ते ॥
आम्हीं तों आपुलें केलेसें जतन । घडो तुम्हांकून[3] घडेल तें ॥
तुका म्हणे विठो चतुराच्या राया । आहे तें कासया मोडों देसी ॥

## ९९. तूं माझा आंगिकार करशील कीं नाहीं याबद्दल मी फार संशयग्रस्त आहे.

करिसी कीं न करिसी माझा अंगिकार । हा मज विचार पडला देवा॥
देसी कीं न देसी पायांचें दर्शन । म्हणऊनी मन स्थिर नाहीं ॥
बोलसी कीं न बोलसी मजसवें देवा । म्हणोनियां जीवा भय वाटे॥
होईल कीं न होय तुज माझा आठव । पडिला संदेह हाचि मज ॥
तुका म्हणे मी तों कर्माईचें[4] हीण । म्हणऊनी सीण करी देवा ॥

## १००. तुला ज्या गोष्टीमुळें संकट पडेल ती गोष्ट तुजजवळ मागून काय उपयोग ?

स्वामीसी संकट पडे जे गोष्टीचें । काय त्या प्रेमाचें सुख मज ॥
दुखवीना चित्त तुझें नारायणा । कांहींच मागेना तुजपाशीं ॥
रिद्धिसिद्धि मोक्ष संपत्ति विलास । सोडियेली आस यांची जीवें ॥
तुका म्हणे एके वेळे देईं भेटी । वोरसोनि[5] पोटीं आलिंगावें ॥

---

१ घण मारण्यांत. २ वेगळा. ३ तुम्हांकडून. ४ कर्तबगारी. ५ पान्हा फुटून.

१०१. तुला देहभाव देऊनही मी अद्याप भय बाळगितों आहे.

तुज दिला देह । आजुनि वागवितों भय ॥
ऐसा विश्वासघातकी । घडली कळतां हे चुकी ॥
बोलतों जें तोंडें । नाहीं अनुभवलें लंडें[1] ॥
दंड लाहे केला । तुका म्हणे जी विठ्ठला ॥

१०२. मी फार बोलका आहे असा मला अभिमान वाटतो.

मजपुढें नाहीं आणीक बोलता । ऐसें कांहीं चित्ता वाटतसे ॥
याचा कांहीं तुम्हीं देखावा परिहार[3] । सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥
कामक्रोधें नाहीं सांडिलें आसन । राहिले बसोन देहामध्यें ॥
तुका म्हणे आतां झालों उतराई । कळों यावें पायीं निरोपिलें[4] ॥

१०३. माझी याति हीन असूनही संतांच्या स्तुतीमुळें माझ्या अंगीं गर्व उत्पन्न होत आहे.

हीन माझी याति । वरि स्तुती केली संतीं ॥
अंगीं वसूं पाहे गर्व । माझें हरावया सर्व ॥
मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥
राख राख गेलों वायां । तुका म्हणे पंढरिराया ॥

१०४. शृंगारलेल्या मढ्याप्रमाणें माझी स्थिति झाली आहे.

पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥
तैसें मज कां गा केलें पंढरीराया । लौकिक हा वायां वाढविला ॥
ज्वरिलियापुढें वाढिलीं मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची ॥
तुका म्हणे मढें शृंगारिलें वरी । तेचि झाली परी मज देवा ॥

---

१ दांडगा. २ प्राप्त होणें. ३ निरसन. ४ सांगितलें.

### १०५. माझी वाणी रसाळ असूनही तुझें दर्शन न झाल्यास तिचा काय उपयोग ?

शिकविला[1] तैसा पढों जाणें पुंसा । कैंचीं साचें[2] दशा[3] तैसी अंगीं ॥
स्वप्नींचिया सुखें नाहीं होत राजा । तैसा दिसे माझा अनुभव ॥
कासया हा केला जिव्हे अळंकार । पायांसीं अंतर दिसतसे ॥
दर्पणींचें[4] धन हातीं ना पदरीं । डोळा दिसे परी सत्याचिये ॥
आस केली तरी लाळचि घोटावी । ठकाठकी[5] तेवीं दिसतसे ॥
कवित्वें रसाळ वदविली वाणी । साक्षही पुराणीं घडे ऐसी ॥
तुका म्हणे गुरें राखोनि गोवारी[6] । माझीं म्हणे परि लाभ नाहीं ॥

### १०६. माझी स्तुति ऐकली असतां माझा जीव कासाविस होतो.

नव्हे सुख मज न लगे हा मान । न राहे हें जन काय करूं ॥
देहउपचारें[7] पोळतसे अंग । विषतुल्य चांग मिष्टान्न तें ॥
नाइकवे स्तुति वर्णितां[8] थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥
तुज पावे ऐसी सांग कांहीं कळा[9] । नको मृगजळा गोवूं मज ॥
तुका म्हणे आतां करीं माझें हित । काढावें जळत आगींतूनि ॥

### १०७. मला लोकांनीं वाळींत टाकिलें तर एकांत तरी मिळेल.

वाळुनिया जन सांडी मज दुरी । करिशील हरी ऐसें कधीं ॥
आठवीन पाय धरूनि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळां ॥
नावडती जीवा आणीक प्रकार । आवडी ते फार एकांताची ॥
तुका म्हणे ऐसी धरितों वासना । होई नारायणा साह्य मज ॥

---

१ शिकणें. २ खरी. ३ स्थिति. ४ आरसा. ५ फसवाफसवी. ६ गुरें राखणारा. ७ सुखोपचार. ८ वर्णन करणें. ९ युक्ति.

१०८. माझ्या गांवचें मला कोणी भेटत नाहीं असें झालें आहे.

आपुलें गांवींचें न देखेसें झालें । परदेशी एकलें किती कंठूं ॥
म्हणऊनि पाहें मूळ[1] येतां वाटे । जीवलग[2] भेटे कोणी तरी ॥
पाहतां अवघ्या दिसतील दिशा । सकळही वोसा[3] दृष्टीपुढें ॥
तुका म्हणे कोणी न सांगे वारता[4] । तुझी वाटे चिंता पांडुरंगा ॥

१०९. ज्याची तुझ्यावर प्रीति आहे अशाची मला संगति दे.

अखंड जया तुझी प्रीति । मज दे तयाचि संगती ।
मग मी कमळापति । तुज बा नाणी[5] कांटाळा ॥
पडून राहेन तये ठायीं। उगाचि संतांचिये पायीं ।
न मगे न करी कांहीं । तुझी आण गा विठोबा ॥
तुम्ही आम्ही पीडों जेणें । दोन्हीं[6] वारतीं एकानें ।
बैसलों धरणें[7] । हाका देत दाराशीं ।
तुका म्हणे या बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ।
न पाहिजे केला । अवघा माझा आव्हेर ॥

११०. शिष्टांचे अनुभव ऐकून माझ्या मनास तळमळ सुटते.

येतील अंतरा शिष्टाचे अनुभव । तळमळे जीव तया सुखा ॥
आतां माझा जीव घेऊनियां बळी । बैसवावे ओळी संतांचिये ॥
विस्तारिली वाचा फळेंविण वेल । कोरडेचि बोल फोस वांझे ॥
तुका म्हणे आलों निर्वाणाचे[8] वरी । राहों नेदीं उरी[9] नारायणा ॥

---

१ आमंत्रण, बोलावणें. २ आवडतें. ३ ओस, उदास. ४ बातमी. ५ आणणार नाहीं. ६ दूर होणें. ७ तगादा. ८ अखेर. ९ बाकी.

१११. ज्यांनीं तुला मूर्तिमंत पाहिलें आहे ते मला हंसतील.

मज ते हांसतील संत । जिहीं देखिलेती मूर्तिमंत ।
म्हणोनीं उबगलें[1] चित्त । आहाच[2] भक्त ऐसा दिसे ॥
ध्यानीं ध्यां वर्णावेती कैसें । पुढें एकीं स्तुति केली असे ।
येथूनी जीव निघत नसे । ऐसिये आसे लागलोंसें ॥
कासया पाडिला जी धडा[3] । उगाचि वेडा आणि वांकडा ।
आम्हां लेकरांशीं पीडा । एका मागें जोडा दुसऱ्याचा ॥
सांगा कोणाचा अन्याय । ऐसें मी धरितो पाय ।
तूं तंव समचि सकळां माय । काय अन्याय एक माझा ॥
नये हा जरी कारणा । तरी कां व्यालेती नारायणा ।
वचन द्यावें जी वचना । मज अज्ञाना समजावी ॥
बहुत दिवस केला बोभाट । पाहातां श्रमलों या वाट ।
तुका म्हणे विस्तारलें ताट । काय वीट आला नेणों स्वामी ॥

११२. मधें कांहीं अरिष्ट न येतां तुझें दर्शन होईल काय ?

काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण ।
ऐसें सांगा तुम्ही संतजन । करा समाधान चित्त माझें ॥
काय हें खंडईल[4] कर्म । पारुषतील[4] धर्माधर्म ।
कासयानें तें कळेल वर्म । म्हणऊनि श्रम वाटतसे ॥
काय स्थिर राहेल बुद्धि । कांहीं अरिष्ट न येल मधीं ।
धरील तें जाईल सिद्धि । शेवट कधीं तो मज न कळे ॥
ऐसें पुण्य होईल गांठीं । घालीन पायीं देवाचे मिठी ।
मज तो कुरवाळील जगजेठी । दाटईन कंठीं सद्गदित ॥

---

१ खिन्न होणें. २ वरवरचा, ढोंगी. ३ रिवाज, वहिवाट. ४ नाश पावणें.

काय हे निवतील डोळे । सुख तें देखोनि सोहळे ।
संचित कैसें तें न कळे । होतील डोहळे वासनेसी ॥
ऐसी चिंता करी सदा सर्वकाळ । रात्रीदिवस हेचि तळमळ ॥
तुका म्हणे नाहीं आपुलें बळ । जेणें फळ पावेन निश्चयेंसी ॥

११३. जन हें ब्रह्मरूप देखण्याचें भाग्य मला कधीं मिळेल ?

ऐसें भाग्य कंई[1] लाहोंतां[2] होईन । अवघे देखे जन ब्रह्मरूप ॥
मग तया सुखा अंत नाहीं पार । आनंदें सागर हेलावती[3] ॥
शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं । परावृत्त[4] संगीं कामादिकां ॥
विवेकासहित वैराग्याचें बळ । धग्धागितो ज्वाळ अग्नि जैसा ॥
भक्ति नवविधा भावशुद्ध बरी । अलंकारावरी मुकुटमणि ॥
तुका म्हणे माझी पुरवी वासना । कोण नारायणा तुजविण ॥

११४. देवानें तुझा अंगिकार केला आहे असे मला ऐकण्यास मिळेल काय ?

कंई मात माझे ऐकती कान । बोलतां वचन संतामुखीं ॥
केला पांडुरंगें तुझा अंगिकार । मग होइल धीर माझ्या जीवा ॥
म्हणऊनि मुख अवलोकितो पाय । हेचि मज आहे थोरी आशा ॥
माझिया मनाचा हाचि पैं विश्वास । न करीं सायास साधनांचे ॥
तुका म्हणे मज होईल भरंवसा । तरलों मी ऐसा साच भावें ॥

११५. देवास आपली आठवण देण्याविषयीं कृपाळु संतांची याचना.

कृपाळु सज्जन तुम्ही संतजन । हेंचि कृपादान तुमचें मज ॥
आठवण तुम्हीं द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुलती ॥

१ केव्हां. २ प्राप्त. ३ हेलकावे खाणें. ४ पराङ्मुख, मागें फिरलेला.

अनाथ अपराधी पतित आगळा । परि पायांवेगळा नका करूं ॥
तुका म्हणे तुम्ही निरविल्यावरी[1] । मग मज हरी उपेक्षीना ॥

११६. मी तुझ्या दारींचा कुतरा आहे, तूं मला ढकलून देऊं नको.

तुझे दारींचा कुतरा । नको मोकलूं[2] दातारा ॥
धरणें[3] घेतलें दारांत । नको धरून उठवूं हात ॥
घातली मुरकुंड[4] । झालों शिरोमणी लंड[5] ॥
तुका म्हणे जगजीवना । ब्रीद पाहें नारायणा ॥

११७. तुझ्या बळानेंच तूं मला राख.

नित्य मनासी करितों विचार । तों हें अनावर विषयलोभी ॥
आतां मज राखें आपुलिया बळें । न देखें हें जाळें उगवतां[6] ॥
सांपडला गळीं नाहीं त्याची सत्ता । उगळी[7] मागुता घेतला तो ॥
तुका म्हणे मी तों अज्ञानचि आहें । परि तुझी पाहें वास[8] देवा ॥

११८. नादांत गुंतलेल्या सर्पाप्रमाणें माझी स्थिति झाली आहे.

सर्प भुलोन गुंतला नादा । गारुडिये फांदां[9] घातलासे ।
हिंडवुनि पोट भरी दारोदारी । कोंडुनि पेटारीं असे रया ॥
तैसी परी मज झाली पांडुरंगा । गुंतलों तो मी गा सोडवी आतां ॥
माझें मज कांहीं न चलेसें झालें । कृपा हे तुज न करितां ॥
आविसें[10] मान लावियला गळीं । भक्ष तो गिळी म्हणूनियां ॥
काढूनि बाहेरी प्राण घेऊं पाहे । तेथें बाप माये कवण रया ॥
पक्षी पिलयां पातलें आशा । देखोनिया फांसां गुंते बळें ।
मरण नेणे सायासें धांवोनि चोरेसे[11] । जीवित्वा नाश झालीं बाळें ॥

---

१ सांगणें. २ हांकलणें. ३ तगादा. ४ शरीर संकोचणें. ५ दांडगा. ६ उकलणें. ७ ओकणें. ८ वाट. ९ अडचण, संकट. १० आमिष. ११ मासा. १२ प्रीति.

**गोडपणें मासा गुंतली लिगाडीं । सांपडे फडफडी अधिकाधिक ॥**
**तुका म्हणे प्राण घेतला आशा । पंढरीनिवासा धांव घाली ॥**

११९. वाट चालून चालून मी आतां फार दमलों आहे.

**पुरली धांव कडिये घेई । पुढें पायीं न चलवी ॥**
**कृपाळुवे पांडुरंगे । अंगसंगे जिवलगे ॥**
**अवघी निवारावी भूक । अवघ्या दुःख जन्माचें ॥**
**तुका म्हणे बोलवना । लावी स्तना ईश्वरे ॥**

१२० मी तृषाक्रांत झालों असल्यानें तूं आपल्या कृपेचा वर्षाव कर.

**करावा वर्षाव । तृषाक्रांत झाला जीव ॥**
**पाहें आकाशाची वास । जाणता तूं जगदीश ॥**
**संयोगें विस्तार । वाढी लागे तो अंकुर ॥**
**तुका म्हणे फळ । चरणांबुज तें सकळ ॥**

१२१. माझ्या उपवासाचें पारणें फेड.

**उपासा सेवटीं अन्नासवें भेटी । तैसी माझी मिठी पडो पायीं ॥**
**पुरवी वासना साच सर्व जाणा । आम्हां नारायणा अंकिताची ॥**
**बहुदिसां पुत्रा मातेसवें भेटी । तैसा दाटो पोटीं प्रीतिउभडु[3] ॥**
**तुका म्हणे धन कृपणा सोइरें । या परि दुसरें नहो आतां ॥**

१२२. एकदां मीं आपला देह तुला दिला आहे; त्याची आतां वारंवार कोण चिंता करितो ?

**मुखें बोलावें तें जीवींचें जाणसी । विदित पायापाशीं सर्व आहे॥**
**आतां हेंचि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणा तुम्ही त्याचा॥**

---

१ लचांड. २ तान्हेला. ३ गहिंवर.

आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या वाहीं पडों नये ॥
तुका म्हणे देह दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥

१२३. अंतर्बाह्य एकच भाव माझे ठायीं असल्यास तूं मला दर्शन दे.

ऐसें सत्य माझें येईल अंतरा । तरिच मज करा कृपा देवा ॥
वचनांसारिखें तळमळी चित्त । बाहेरि तो आंत होईल भाव ॥
तरिच मज ठाव द्यावा पायापाशीं । सत्यत्वें जाणशी दास खरा ॥
तुका म्हणे सत्य निकट सेवक । तरिच भातुकें प्रेम द्यावें ॥

१२४. आतां तुझा व माझा वियोग होईल असें चिन्ह दिसतें.

तुम्हां आम्हां तुटी[3] होईल यावरी । ऐसें मज हरी दिसतसे ॥
वचनाचा कांहीं न देखों आधार । करावा हा धीर कोठवरी ॥
सारिलें[4] संचित होतें गांठीं कांहीं । पुढें ऋण तेंही नेदी कोणी ॥
जावेंचि नलगे कोणाचिया घरा । उडाला[5] पातेरा[5] तुझ्यासंगें ॥
तुका म्हणे आम्हां हाचि लाभ झाला । मनुष्य[6]धर्म गेला पांडुरंगा ॥

१२५. माझ्या बुद्धीस संचार झाला आहे असें समजून
मला कोणी थार देत नाहीं.

आतां सांडूं तरी हातीं ना पदरीं । सखीं सहोदरीं[7] मोकलिलों[8] ॥
जनाचारा[9]मध्यें उडाला पातेरा । झालों निलाजिरा[10] म्हणऊनि ॥
कोणाचिया दारा जावेनासें झालें । म्यांच विटंबिलें आपणासी ॥
कोण झाला माझे बुद्धीस संचार । नाहीं कोठें थार ऐसें झालें ॥
तुका म्हणे तुज भक्त झाले फार । म्हणोनियां थार[11] नाहीं येथें ॥

---

१ प्रवाह. २ खाऊ. ३ वियोग. ४ भोगून संपवणें. ५ बोज उडणें. ६ मनुष्यपणा.
७ सख्खा भाऊ. ८ सोडणें. ९ लौकिक व्यवहार. १० निर्लज्ज. ११ आश्रय.

१२६. माझें चित्त खापरावरच्या लाहीप्रमाणें तडफडत आहे.

धरितों वासना परि नये फळ । प्राप्तीचा तो काळ नाहीं आला ॥
तळमळी चित्त घातलें खापरीं । फुटतसे परी लाहीचिया ॥
प्रकार ते कांहीं नावडती जीवा । नाहीं पुढें ठावा काळ हातीं ॥
जातों तळा येतों मागुतला वरी । वोळशांचे[1] फेरीं सांपडलों ॥
तुका म्हणे बहु करितों विचार । उतरें डोंगर एक चढे ॥

१२७. माझें कर्म तुझ्याहूनही बलवत्तर झालें आहे.

मज नाहीं धीर । तुम्हीं न करा अंगीकार ॥
ऐसे पडिले विषम[2] । बळी देवाहूनि कर्म ॥
चालों नेणे वाट । केल्या न पवेचि बोभाट ॥
वेंचों नेणें जीवें । तुका उदास धरिला देवें ॥

१२८. माझ्यासारख्या वायां गेलेल्या मनुष्यास तारण्यांतच तुझा मोठेपणा आहे.

तरले ते मागें आपुलिया सत्ता । कमाई अनंता करूनियां ॥
उसणें फेडितां धर्म तेथें कोण । ते तुज अनन्य तुम्ही त्यांसी ॥
मज ऐसा कोण सांगा वायां गेला । तो तुम्हीं तारिला पांडुरंगा ॥
तुका म्हणे नामासारिखी करणी[3] । न देखेचि मनीं समजावें ॥

१२९. तुझ्या नामामध्येंहि शक्ति नाहीं; तुझ्यामध्येंहि शक्ति नाहीं.

कळों आलें ऐसें आतां । नाहीं सत्ता तुम्हांसी ॥
तरी वीर्य नाहीं नामा । जातो प्रेमा खंडतें[4] ॥
आड ऐसें येतें पाप । वाढे ताप आगळा ॥
तुका म्हणे गुण झाला । हा विठ्ठल हीनशक्ति ॥

---

१ पाण्यांतील भोंवरा. २ प्रतिकूल. ३ कृति. ४. कमी होत.

### १३०. भक्तांमुळें तुला देवपण आलें आहे हें तूं विसरलास.

जेणें तुज झालें रूप आणि नांव । पतितं[1] हे देव तुझें आम्हीं ।
नाहीं तरी तुज कोण हो पुसतें । निराकारीं तेथें एकाएकीं ॥
अंधारें ते दीपा आणियेली शोभा । माणिकासी प्रभा कोंदणाची ॥
धन्वंतरी[2] रोगें आणिला उजेडा । सुखीं काय चाडा जाणावें त्या ॥
अमृतासी मोल विषाचिये गुणें । पितळ तरी सोनें उंच निंच ॥
तुका म्हणे आम्ही असोनियां जाण । तुज देवपण आणियेलें ॥

### १३१. समर्थास उपकाराची आठवणच नसते.

आमुचिया भावें तुज देवपण । तें कां विसरोन राहिलासी ॥
समर्थासी नाहीं उपकारस्मरण । दिल्या आठवण वांचोनियां ॥
चळण वळण सेवकाच्या बळें । निर्गुणाचे मुळें सांभाळावें ॥
तुका म्हणे आतां आलों खंडावरी[3] । प्रेम देउनि हरी बुझवावें[4] ॥

### १३२. माझ्या भांडखोर तोंडास खवळविल्यामुळें आतां मी तुला शिव्या देईन.

बरें आम्हां कळों आलें देवपण । आतां गुजें[5] कोण राखे तुझें ॥
मारिलें कां मज सांग आजिवरी । आतां सरोबरी[6] तूज मज ॥
जें आम्हीं बोलों तें आहे तुझ्या अंगीं । देईन प्रसंगीं आजि शिव्या ॥
निलाजिरा तुज नाहीं यातिकुळ । चोरटा शिंदळ ठावा मज ॥
खासी धोंडे माती जीव जंत झाडें । एकलें उघडें परदेसी ॥
गाढव कुतरा ऐसा मज ठावा । बईल तूं देवा भारवाही ॥
लटिका तूं मागें बहुतांसि ठावा । आलें अनुभवा माझ्या तेंही ॥
तुका म्हणे मज खवळिलें भांडों[7] । आतां धीर तोंडा न धरवे ॥

---

१ पापी. २ वैद्य. ३ निवाडा. ४ समजावणें. ५ गुप्त. ६ सामना, बरोबरी. ७ भांडखोर, निर्लज्ज.

१३३. तूं भिकारी व आम्हीं निलाजरे हें आम्हांस कळून आलें.

न बोलावें परि पडिला प्रसंग । हाकालितें[1] जग तुझ्या नामें ॥
लटिकेंची सोंग मांडिला पसारा । भिकारी तूं खरा कळों आलें ॥
निलाजिरीं आम्हीं करोनियां धीर । राहिलों आधार धरूनियां ॥
कैसा नेणों आतां करिसी शेवट । केली कटकट त्याची पुढें ॥
तुका म्हणे कांहीं न बोलसी देवा । उचित हे सेवा घेसी माझी ॥

१३४. तूं आपल्याप्रमाणेंच आपल्या दासांस भिकारी करितोस.

तुझा संग पुरे संग पुरे । संगति पुरे विठोबा ॥
आपल्यासारिखें करिसी दासां । भिकारीसा जग जाणे ॥
रूपा नाहीं ठाव नांवा । तैसें आमुचें करिसी देवा ॥
तुका म्हणे तोयें आपुलें भेंडोळें[2] । करिसी वाटोळें माझें तैसें ॥

१३५. तूं तर आतां भ्याड दिसतोस.

आम्ही म्हणों कोणी नाहीं तुज आड । दिसतोसी भ्याड पांडुरंगा ॥
हा गे माझ्या भोगें केलासी परता । विश्वंभरीं सत्ता नाहीं ऐसी ॥
आम्हीं असों तुज देऊनि आधार । नाम वारंवार उच्चारितों ॥
तुका म्हणे मज धरियेलें काळें । पंचभूतीं खळें करूनियां ॥

१३६. तुझ्यामध्यें औदार्य मुळींच नाहीं.

पराधीन माझें करूनियां जीणें । सांडी काय गुणें केली देवा ॥
उदार हे कीर्ति असे जगामाजी । कां तें ऐसें आजि पालटिलें ॥
आळवितों परी न पुरेचि रीग । उचित तो त्याग नाहीं तुम्हां ॥
तुका म्हणे कां बा मुळींच व्यालासी । ऐसें कां नेणसी पांडुरंगा ॥

---

१ हांका मारणें, ओरडणें. २ गुंडाळी.

१३७. तुझी शक्ति हीन झाल्यामुळें तुझा दास म्हणविण्याची मला आतां लाज वाटते.

कां गा केविलवाणा केलों दीनाचा दीन ।
काय तुझी हीन शक्ति जालीसे दिसे ॥
लाज येते मना तुझा म्हणवितां दास ।
गोडी नाहीं रस बोलिलिया सारिखी ॥
लाजविलीं मागें संतांचीं हीं उत्तरें ।
कळों येतें खरें दुजें एकावरूनी ॥
तुका म्हणे माझी कोणी वदविली वाणी ।
प्रसादावांचूनी तुमचिया विठ्ठला ॥

१३८. तुला द्यावयाचें असेल तर आतां उशीर कां ?

काळावरी घालूं तरि तो सरिसा[1] । न पुरतां इच्छा दास कैसें ॥
आतां नाहीं कांहीं उशिराचें काम । न खंडावें प्रेम नारायणा ॥
देणें लागे मग विलंब कां आड । गोड तरी गोड आदि अंत ॥
तुका म्हणे होईल दर्शनें निश्चिंती । गाईन ते गीतीं ध्यान मग ॥

१३९. तूं इतका हृदयस्थ असूनही माझा कंठस्फोट तुला ऐकूं येत नाहीं ?

कां रे माझा तुज नये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ॥
अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणा कंठस्फोट ॥
कां हें चित्त नाहीं पावत विश्रांति । इंद्रियांचि गति कुंठेचिना ॥
तुका म्हणे कांहो धरियेला कोप । सरलें नेणों पाप पांडुरंगा ॥

---

१ बरोबर.

### १४०. तूं आपलें धन जतन करून कोणास देणार ?

जोडी कोणासाठीं । एवढी करितोसि आटी ॥
जरी हें आम्हां नाहीं सुख । रडों पोरें पोटीं भूक ॥
करुनी जतन । कोणा देसील हें धन ॥
आमचें तळमळें । तुझें होईल वाटोळें ॥
घेशील हा श्राप । माझा होउनियां बाप ॥
तुका म्हणे उरी[1] । आतां न ठेवी यावरी ॥

### १४१. तुझें नाम न घेतां मी तुझें कुळ बुडवीन.

करूनी चाहाडी । अवघी बुडवीन जोडी ॥
जरी तूं होउनी उदास । माझी बुडविसी आस ॥
येथें न करीं काम । मुखें नेघे तुझें नाम ॥
तुका म्हणे कुळ । तुझें बुडवीन समूळ ॥

### १४२. समर्थाच्या पोटीं आम्हीं करंटीं जन्मलों अशी तुझ्या नामाची फजिती झाली आहे.

समर्थाचे पोटीं । आम्हीं जन्मलों करंटीं[2] ॥
ऐशी झाली जगीं कीर्ति । तुझ्या नामाची फजिती ॥
येथें नाहीं खाया । न ये कोणी मूळ[3] न्याया ॥
तुका म्हणे जिणें[4] । आतां खोटें जीवपणें ॥

### १४३. मला हें पूर्वी माहीत असतें तर मी तुझ्या पाठीशींचं लागलों नसतों.

वायांविण वाढविला हा लौकिक[5] । आणिला लटिक वाद दोघां ॥
नाहीं ऐसा झाला देव माझ्या मतें । भुकेलें जेवितें काय जाणे ॥

---

१ बाकी. २ दुर्दैवी. ३ आमंत्रण. ४ जगणें. ५ कीर्ति.

शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी । साच तें अंतरीं विवेचिना ॥
झालों परदेशी गेले दोन्ही ठाव । संसार ना पाय तुझे देवा ॥
तुका म्हणे मागें कळों येतें ऐसें । न घेतों हें पिसें[1] लावूनियां ॥

१४४. ज्याला असेल त्याला असो; माझें मतें देव मेला आहे.

माझे लेखीं[2] देव मेला । असो त्याला असेल ॥
गोष्टी न करी नांव नेघे । गेलों दोघे खंडोनि ॥
स्तुतिसमवेत[3] निंदा । केला धंदा उदंड ॥
तुका म्हणे निवांत ठेलों । वेंचित आलों जीवित्व ॥

१४५. आतां देह करवतावर कापूं, कीं अग्नीवर जाळूं ?

काय देह घालूं करवतीं कमेरीं[4] । टाकूं भीतरीं अग्निमाजी ॥
काय सेवूं वन शीत उष्ण तान । साहों कीं मोहनें[5] धरुनी बैसों ॥
काय लावूं अंगीं भस्मउधळण[6] । हिंडूं देश कोण खुंटें[7] चारी ॥
काय त्यजूं अन्न करूनि उपास । काय करूं नास जीवित्वाचा ॥
तुका म्हणे काय करावा उपाव । ऐसा देईं भाव पांडुरंगा ॥

१४६. तुझ्यासाठीं आतां मी आत्मघात करितों.

कळलें माझा तुज नव्हे रे आठव । काय काज जीव ठेवूं आतां ॥
तूं काय करिसी माझिया संचिता । धिग हे अनंता झालें जिणें ॥
पतितपावन राहिलों ये आशा । आइकोनि ठसा[8] कीर्ति तुझी ॥
आतां कोण करील माझा अंगीकार । कळलें निष्ठुर झालासी तूं ॥
तुका म्हणे माझी मांडिली निरास । करितों जीवा नास तुजसाठीं ॥

---

१ वेड. २ मतें. ३ बरोबर. ४ एक प्रकारचें शस्त्र. ५ मौन्य. ६ भस्माची उटी. ७ चारी धाम. ८ प्रसिद्धि.

# ४. तुकारामांचे स्वानुभूत्युद्गार.

### १४७. तुकाराम देवाचें श्रीमुख पाहतात.

सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें ॥
मनें धरिला अभिलाष । मिठी घातली पायांस ॥
होतां दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ॥
तुका म्हणे झाला । लाभें लाभ दुणावला ॥

### १४८. समचरण अमूर्तमूर्तीचें दर्शन.

बरवा झाला वेवसाव । पावलों चिंतिलाचि ठाव ।
दृढ पायीं राहिला भाव । पावला जीव विश्रांति ॥
बरवा फळला शकुन । अवघा निवारला सीण ।
तुमचें झालियां दरुषण । जन्ममरण नाहीं आतां ॥
बरवें झालें आलों या ठायां । होतें संचित ठायींचें पाया ।
देहभाव पालटली काया । पडली छाया ब्रह्मींची ॥
जोडिलें हें न सरे धन । अविनाश आनंदघन ।
अमूर्तमूर्ति मधुसूदन । समचरण देखियेले ॥
जुनाट जुगादीचें नाणें । बहुतां काळाचें ठेवणें ।
लोपलें होतें पारिखेपणें । ठाव चळणें चुकाविला ॥

---

१ बनलेलें, घडलेलें. २ त्वरित. ३ दुप्पट झाला. ४ व्यवहार. ५ युगादींचें, युगारंभींचें. ६ अपरिचितपणा.

आतां या जीवाचियासाठीं । न सोडी पडालिया मिठी ।
तुका म्हणे सीणलों जगजेठी । न लवीं दिठी दुसऱ्याची ॥

१४९. संतसमागमानें भाग्य उजळतें.

उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥
संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥
संपुष्ट[1] हे हृदयपेटी । करूनि पोटीं साठवूं ॥
तुका म्हणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥

१५०. अवचितांच ठेवा हातीं येतो.

अवचितांचि[2] हातीं ठेवा । दिला सेवा न करितां ॥
भाग्य फळलें झाली भेटी । नेघें[3] तुटी यावरी ॥
दैन्य गेलें हरली चिंता । सदैव आतां यावरी ॥
तुका म्हणे वांटा झाला । बोलों बोला देवासीं ॥

१५१. मागें न पाहतां पंथराजाचें आक्रमण.

सर्वविशीं आम्हीं हेचि जोडी केली । स्वामिची साधिली चरणसेवा ॥
पाहिलेंचि नाहीं मागें परतोनि । जिंकिला तो क्षणोक्षणीं काळ ॥
नाहीं पडों दिला विचाराचा गोवा[4] । नाहीं पोटीं हेवा येऊं दिला ॥
केली लागवेगें अवघीची तांतडी[5] । भावना ते कुडी दुराविली ॥
कोठें मग ऐसें होतें सावकाश । जळो तया आस वेव्हाराची ॥
तुका म्हणे लाभ घेतला पाल्लवीं[6] । आतां नाहीं गोवी कासयाची ॥

---

१ देव ठेवण्याची पेटी. २ एकदम. ३ वियोग. ४ गुंता, अडचण. ५ त्वरा. ६ पदर.

## १५२. यातिहीन मतिहीन असल्यानें देवानें केलेला अंगिकार.

यांतिमतिहिन रूपें लीन दीन । आणीक अवगुण जाणोनियां ॥
केला त्या विठ्ठलें माझा अंगीकार । ऐसा हा विचार जाणोनियां ॥
जें कांहीं करितों तें माझें स्वहित । आली हे प्रचितें कळों चित्तां ॥
झालें सुख जीवा आनंद अपार । परमानंदें भार घेतला माझा ॥
तुका म्हणे यासी नांवाचा अभिमान । म्हणोनि शरण तारी बळें ॥

## १५३. बहुतां दिसांच्या भेटीनें झालेली परमानंदप्राप्ति.

बहुतां दिसांची आजि झाली भेटी । झाली होती तुटी काळगती ॥
येथें सावकाश घेईन ते धणी । गेली अडचणी उगवोनि ॥
बहु दुःख दिलें होतें घरीं कामें । वाढला हा श्रमें श्रम होता ॥
बहु दिस होता सांडिला मारग । क्लेशाचा तो त्याग आजि झाला ॥
बहु होती केली सोंगसंपादणी । लौकिकापासूनि निर्गमलें ॥
तुका म्हणे येथें झालें अवसान । परमानंदीं मन विसावलें ॥

## १५४. एकांतांत सुखोपभोग.

आपुल्यां आम्हीं पुसिलें । नाहीं तुज कांहीं कारणें ॥
मागें मागें धांवत आलों । कांहीं बोलों यासाठीं ॥
बहुत दिस होतें मनीं । घ्यावी धणी एकांतीं ॥
तुका म्हणे उभा राहे । कान्हो पाहे मजकडे ॥

## १५५. लाभाची अनिर्वर्णनीयता.

कोण पुण्य फळा आलें । आजि देखिलीं पाउलें ॥
ऐसें नेणों नारायणा । संतीं सांभाळिलें दीना ॥

१ जात. २ अनुभव. ३ बाहेर आलें. ४ शेवट. ५ तृप्ति.

कोण लाभकाळ । दीनें आजींचा मंगळ ॥
तुका म्हणे झाला । एवढा लाभ कां विठ्ठला ॥

## १५६. सर्व दिशांस शुभचिन्होदय.

शुभ झाल्या दिशा अवघाचि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ॥
हातींचिया दीपें दुराविली निशी । न देखिजे कैसी आहे तेही ॥
सुख दुःखाहूनि नाहीं विपरीत । देतील आघांत हितफळें ॥
तुका म्हणे आतां आम्हांसी हें भलें । अवघेचि झाले जीवजंत ॥

## १५७. आत्यंतिक सुखामुळें तृप्त्यभाव.

धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलांसे प्रीत तुझे नामीं ॥
धन्य जालों आतां यासी संदेह नाहीं । न पडो या वांहीं काळाहातीं ॥
ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संताच्या संगतीं सर्वकाळ ॥
तुका म्हणे पोट धालेंचि न धाये । खादलेंचि खाये आवडीनें ॥

## १५८. कायमचा उत्सवप्रसंग.

आजी आनंदु रे एकी परमानंदु रे ।
जया श्रुति नेति म्हणती गोविंदु रे ॥
विठोबाची वेडीं आम्हां आनंदु सदा ।
गाऊं नाचों वाहूं टाळी रंजवूं गोविंदा ॥
सदा सण सांत आम्हां नित्य दिवाळी ।
आनंदें निर्भर आमचा कैवारी बळी ॥
तुका म्हणे नाहीं जन्ममरणाचा धाक ।
संत सनकादिक हे तों आमुचें कवतुक ॥

---

१ दिवस. २ रात्र. ३ विघ्नें. ४ मार्ग. ५ तृप्त होणें. ६ बाजार. ७ पाठिराखा.

### १५९. लाभानें लाभ दुणावतो.

विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥
माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥
लाभाचियां सोसें पुढें चाले मन । धनाचा कृपण लोभी जैसा ॥
तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय ॥

### १६०. भक्त देवास ऋणी करून ठेवितो.

घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्ता आत्मस्थिति सांडवीन ॥
ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥
तीर्थभ्रामकासी आणीन आळस । कडू स्वर्गवास करिन भोग ॥
सांडवीन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥
भक्तिभाग्यसीमा साधीन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निज ठेवा ॥
धन्य म्हणवीन इहलोकीं लोकां । भाग्य आम्हीं तुका देखियेला ॥

### १६१. अज्ञानांधकार निरसल्यानें विश्व धवळित होतें.

धवळलें[2] जगदाकार । आंधार तो निरसला[3] ॥
लपों जातां नाहीं ठाव । प्रगट पाहे पसारा ॥
खरियाचा दिवस आला । वाढी बोला न पुरे ॥
तुका म्हणे जीवें साटीं । पडिली मिठी धुरेसी[4] ॥

### १६२. कोंदणांत बसविलेल्या हिऱ्याप्रमाणें देवाचें दर्शन.

हिरा शोभला कोंदणीं । जडित माणिकांची खाणी ॥
तैसा दिसे नारायण । मुख सुखाचें मंडण ॥
कोटिचंद्रलीळा । पूर्णिमेचा पूर्णकळा ॥
तुका म्हणे दृष्टि धाये । परतोनि माघारी ते न ये ॥

---

१ वृत्तिरूपी लाळ. २ शुद्ध प्रकाशणें. ३ नाहींसा झाला. ४ श्रेष्ठ.

### १६३. दिवसरात्र लोपून अखंड ज्योतिप्रकाश.

देवा तूं आमचा कृपाळ । भक्तप्रतिपाळ दीनवत्सल ।
माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ॥
तुज लागली सकळ चिंता । राखणें लागे वांकडें जातां ।
पुढतीं निरोविसी[1] संता । नव्हे विसंबतां[2] धीर तुज ॥
आम्हां भय चिंता नाहीं धाक । जन्ममरण कांहीं एक ।
जाला इहलोकीं परलोक । आलें सकाळिक वैकुंठ ॥
न कळे दिवस राती । अखंड लागलीसे ज्योति ।
आनंदलहरीची गति । वर्णूं किती तया सुखा ॥
तुझिया नामाचीं भूषणें । तियें मज लेवविलीं लेणें[3] ।
तुका म्हणे तुझिया गुणें । काय तें उणें एक आम्हां ॥

### १६४. निजरूपानुभवांत अनाहतश्रवण.

पांडुरंगें सत्य केला अनुग्रह[4] । निरसोनि[5] संदेह बुद्धिभेद ॥
जीवाशिवा सेज[6] रचिली आनंदें । आउटाविये[7] पदीं आरोहण ॥
निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहत[8] बाळका हुलुरु[9] गाती ॥

### १६५. अनाहतसुखांत गुंतल्यानें वृत्त्युद्गमाचा उच्छेद.

अनुहातीं गुंतला नेणें बाह्यरंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥
मदें मांतें[10] तया नाहीं देहभाव । आपुले अवयव आवरितां ॥
आणिकांची वाणी वदे तेणें मुखें । उपचारदुःखें नाठवतीं ॥
तें सुख बोलतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ॥
तुका म्हणे बाह्य रंग ते विटले । अंतर निवालें ब्रह्मरसें ॥

---

१ सोंपवणें, स्वाधीन करणें. २ विसरणें ३ अळंकार. ४ कृपा, प्रसाद. ५ नाहींसें करणें. ६ शय्या. ७ औट, साडेतीन, ॐकाररूप. ८ योगधारणेंत ऐकूं येणारा ध्वनि. ९ गीत, गाणें. १० मस्त होणें.

१६६. जिकडे मी जाईन तिकडे देव पाठीशींच लागतो.

एकाचिये वेठी[1] । सांपडलों फुकासाठीं ॥
घेतो काम सत्ताबळें । माझें करूनि भेंडोळें[2] ॥
धांवे मागें मागें । जाय तिकडे चालत लागे ॥
तुका म्हणे नेलें । माझें सर्वस्व विठ्ठलें ॥

१६७. हरि हा भोंवताला भोंवत आहे.

आंत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिलें ॥
हरिनें कामा घातला चिरा[3] । चित्तवरा मुकविलें ॥
हरिनें जीवें केली साटी । पाडिली तुटी सकळांसी ॥
तुका म्हणे वेगळा नव्हे । हरि हा भोंवे[4] भोंवताला ॥

१६८. मी तुज पाहीपर्यंत तूं असाच माझ्या दृष्टीपुढें उभा रहा.

आवडे हें रूप गोजिरें सगुण । पाहतां लोचनें[5] सुखावले ॥
आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहे । जों मी तुज पाहें पांडुरंगा ॥
लांचावलें[6] मन लागलीसे गोडी । तें जीवें न सोडी ऐसें झालें ॥
तुका म्हणे आम्हीं मागावी लडिवाळीं[7] । पुरवावी आळी[8] मायबापा ॥

१६९. जेथें मी जातों तेथें तूं मजबरोबर आहेस.

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती[9] । चालविसी हातीं धरूनियां ॥
चालों वाटे आम्हीं तुझाचि आधार । चालविसी भार सवें[10] माझा ॥
बोलों जातां बरळें[11] करिसी तें नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥

१ बिगारी. २ गुंडाळें. ३ दगड. ४ फिरतो. ५ डोळे. ६ संवकणें. ७ लाडक्यांनीं. ८ हट्ट, छंद. ९ सोबती. १० बरोबर. ११ बडबड.

अवघे जन मज झाले लोकपाळ[१] । सोइरे सकळ प्राणसखे ॥
तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । झालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥

१७०. आम्हीं उभयतां एकमेकांत सांपडून गेलों आहों.

माझे माथां तुझा हात । तुझे पायीं माझें चित्त ॥
ऐसी पडियेली गांठीं । शरीरसंबंधाची मिठी ॥
येरयेरांपाशीं । सांपडोन गेलों ऐसी ॥
तुका म्हणे सेवा । माझी, कृपा तुझी देवा ॥

१७१. मीच माझ्या पोटीं निर्माण झालों.

मीचि मज व्यालों । पोटा आपुलिया आलों ॥
आतां पुरले नवस । निरसोनि[२] गेली आस ॥
झालों बरा बळी । गेलों मरोनि ते काळीं ॥
दोहींकडे पाहे । तुका आहे तैसा आहे ॥

१७२. स्वस्वरूपाचें दर्शन.

दाता नारायण । स्वयें भोगिता आपण ॥
आतां काय उरलें वाचे । पुढें शब्द बोलायाचे ॥
देखतां जे डोळे । रूप आपुलें तें खेळे ॥
तुका म्हणे नाद । जाला अवघा गोविंद ॥

१७३. मी आपणाच आपल्यास कोंडून घेतलें आहे.

न[३]भोमय जालें जळ । एकीं सकळ हरपलें ॥
आतां काय सारासारी । त्याच्या लहरी[४] तयांत ॥
कैंचा तेथ यावा[५] सांडी । आप कोंडी आपणा ॥
तुका म्हणे कल्प[६] झाला । अस्त गेला उदयो ॥

---

१ अधिकारी. २ नाहींसें होणें. ३ आकाशापर्यंत एकरूप. ४ लाट. ५ घेणें, स्वीकार. ६ प्रळयसदृश एकंकार.

१७४. स्वरूपदर्शनानें मन वेडें होऊन जातें.

जाय तिकडे लागे पाठीं । नाहीं तुटी आठवाची ॥
हिरोनियां नेलें चित्त । माझें थीतं[1] भांडवल ॥
दावूनिया रूप डोळां । मन चाळा[2] लावियेलें ॥
आणिक तोंडा पडिली मिठी । कान गोष्टी नाइकती ॥
बोलिल्याचा आठव न घडे । वाणी ओढे ते सोई ॥
तुका म्हणे प्रेमधगी[3] । भरली अंगीं अखंड ॥

१७५. जणूं एकादा संचारच अंगांत झाला आहे!

आतां नव्हे गोड करितां संसार । आणीक संचार जाला माजी ॥
ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला ॥
रसनेचिये रुची कंठीं नारायण । बैसोनियां मन निववीलें ॥
तुका म्हणे आतां बैसलों ठाकणीं[4] । इच्छेची ते धणी पुरईल ॥

१७६. सर्वत्र स्वरूपदर्शनानें एकांतवासाचा नाश.

संसाराच्या भेणें[5] । पळों न लाहेसें केलें ॥
जेथें तेथें आपण आहे । आम्ही करावें तें काये ॥
एकांतासी ठाव । तिहीं लोकीं नाहीं वाव[6] ॥
गांवा जातों ऐसें । नलगे म्हणावें तें कैसें ॥
स्वप्नाचे परी । जागा पाहे तंव घरीं ॥
तुका म्हणे काये । तुझें घेतलें म्यां आहे ॥

१७७. मजला वाटेल त्या वेळेस देवाकडून उत्तर मिळवितां येईल.

माझा पहा अनुभव । केला देव आपुला ॥
बोलविलें तेंचि द्यावें । उत्तर व्हावें ते काळीं ॥

---

१जवळ असलेलें. २छंद. ३प्रेमरूपी अग्नि. ४स्थान, ठिकाण. ५भीतीनें. ६जागा.

सोडलिया जग निंद्य । मग गोविंद म्हणियारा[1] ॥
तुका म्हणे धीर केला । तेणें याला गोंविलें[2] ॥

## १७८. संकल्पाच्या उदयाबरोबर त्याचें समाधान.

आमुचें उचित हेचि उपकार । आपलाचि भार घालूं तुज ॥
भूक लागलिया भोजनाची आळी[3] । पांघुरणें काळीं शीताचिया ॥
जेणें काळें उठी मनाची आवडी । तेंचि मागों घडी आवडतें ॥
दुःख येऊं नेदी आमुचिया घरा । चक्र करी फेरा भोंवताला ॥
तुका म्हणे नाहीं मुक्तीसवें चाड । हेंचि आम्हां गोड जन्म घेतां॥

## १७९. मी न पाहतां पहात आहे.

न देखोन कांहीं । म्यां पाहिलें सकळही ॥
झालों अवघिया परी[4] । मी हें माझें ठेलें[5] दुरी ॥
न घेतां घेतलें । हात पाय उसांतिलें[6] ॥
खादलें न खातां । रसना रस झाली घेतां ॥
न बोलोनि बोलें । केलें प्रकट झांकिलें ॥
नाइकिलें कानीं । तुका म्हणे आलें मनीं ॥

## १८०. एकाएकीं तुकाराम निराळे होतात.

काम नाहीं काम नाहीं । झालों पाहीं रिकामा ॥
फावल्या[7] या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा बैसोनि ॥
नसत्या छंदें नसत्या छंदें । जग विनोदें विव्हळतसे ॥
एकाएकीं एकाएकीं । तुका लोकीं निराळा ॥

---

१ सेवक. २ गुंतवून टाकणें. ३ हट्ट. ४ प्रकार. ५ राहिलें. ६ आक्रमण केलें. ७ सांपडल्या.

### १८१. अखंडितस्वरूपावस्थान.

कांहींच मी नव्हे कोणिये गांवींचा । एकटा ठायींचा ठायीं एक ॥
नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघेंचि वायांविण बोले ॥
नाहीं मज कोणी आपुलें दुसरें । कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ॥
नाहीं आम्हां [1]ज्यावें मरावें लागत । आहों अखंडित जैसे तैसे ॥
तुका म्हणे नांव रूप नाहीं आम्हां । वेगळा त्या कर्मा अकर्मासी॥

### १८२. सर्व जन देवरूप होतात.

देव झाले अवघे जन । दोषगुण हारपले ॥
बरवें झालें बरवें झालें । चित्त धालें महालाभें ॥
दर्पणींचें दुसरें भासे । परि तें असे एक तें ॥
तुका म्हणे सिंधुभेटी । उदका तुटी [2]वाहोळासी ॥

### १८३. आमचा स्वदेश म्हणजे भुवनत्रय होय.

आमुचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥
मायबापाची लाडकीं । कळों आलें हें लौकिकीं ॥
नाहीं [3]निपरा्द । कोणां आम्हांमध्यें भेद ॥
तुका म्हणे नाम । अवघें आमचें हें [4]धाम ॥

### १८४. सर्व विश्व ब्रह्म झाल्यावर देवाची पूजा कशी शक्य आहे ?

कासियानें पूजा करूं केशिराजा । हाचि संदेह माझा फेडी आतां॥
उदकें न्हाणूं तरी स्वरूप तें तुझें । तेथें काय माझें [5]वेंचे देवा ॥
गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय करूं ॥
फळदाता तूंच तांबोल अक्षता । तरी काय अनंता वाहूं तूज ॥

---

१ जगावें. २ ओहोळ. ३ दुष्ट, नीच. ४ राहण्याचें ठिकाण ५ खर्चतें.

वाहूं दक्षिणा तरी [1]धातु नारायण । ब्रह्म तेंचि अन्न दुजें नाहीं ॥
गातां तूं ओंकार टाळी नादेश्वर । नाचावया [2]थार नाहीं कोठें ॥
तुका म्हणे मज आवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्ण हरी ॥

## १८५. ब्रह्माचा विश्वव्यापकत्वानें साक्षात्कार.

जेथें देखे तेथें तुझींच पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें ।
रूप गुण नाम अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें ॥
जातां लोटांगणीं अवघीच मेदिनी[3] । सकळ देवपाट झालें ॥
सदा सर्वकाळ सुदिन सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें ॥
अवघा आम्हां तूंच झालासी देवा । संसार हेवा कामधंदा ॥
नलगे जाणें कोठें कांहींच करणें । मुखीं नाम ध्यान सदा ॥
वाचा बोले ते तुझेचि गुणवाद । मंत्र जप कथा स्तुति ॥
भोजन [4]सारूं ठायीं फल तांबोल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती ॥
चालतां प्रदक्षिणा निद्रा लोटांगण । दंडवत तुजप्रति ॥
देखोन दृष्टी परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मूर्ति ॥
झाल्या तीर्थरूप [5]बावी नदी [6]कूप । अवघें गंगाजळ झालें ।
महाल मंदिरें माझ्या [7]तणघरें । झोपड्या अवघीं देव [8]देवाइलें ॥
ऐके कानीं त्या हरिनामध्वनी । नाना शब्द होते झाले ॥
तुका म्हणे आम्ही या विठोबाचे दास । सदा प्रेमसुखें धालों रे ॥

## १८६. देवाच्या साक्षात्काराचीं चिन्हें.

देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याच्या पडे [9]चिरां मनुष्यपणा ॥
देवाची ते खूण गुंतों नेदी आशा । ममतेच्या पाशा शिवों नेदी ॥
देवाची ते खूण करावें वाटोळें । आपणावेगळें कोणी नाहीं ॥

---

१ द्रव्य. २ आश्रय. ३ पृथ्वी. ४ आटोपणें. ५ विहीर. ६ कुंवा. ७ तृणघरें. ८ देऊळ. ९ धोंडा.

देवाची ते खूण झाला जया संग । त्याचा झाला भंग मनुष्यपणा॥
देवाची ते खूण करावें तोंडाळ । आणि हें सकळ जग हरी ॥
देवाची ते खूण गुंतों नेदी वाचा । लागों असत्याचा मळ नेदी ॥
पहा देवें तेंचि बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं॥

१८७. आम्हांस नारी रिसाप्रमाणें दिसतात.

मृत्युलोकीं आम्हां आवडती परी । नाहीं एका हरिनामाविण ॥
विटलें हें चित्त प्रपंचापासूनि । वमन तें मनीं बैसलेंसे ॥
सोनें रुपें आम्हां मृत्तिकेसमान । माणिकें पाषाण[२] खडे तैसे॥
तुका म्हणे तैशा दिसतील नारी । [३]रिसाचियापरि आम्हांपुढें ॥

१८८. संत कळिकाळास भिणार नाहींत.

दीप घेउनियां धुंडिती[४] आंधार । भेटे हा विचार अघटित ॥
विष्णुदास आम्हीं न भ्यों कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें॥
उघळितां माती रविकळा[६] मळे । हें कैसें न कळे भाग्यहीना ॥
तुका म्हणे तृणें झांके हुताशन । हें तंव वचन वाउगेंचि ॥

१८९. देह कामक्रोधानीं रिकामा केला असून देवानें भरला आहे.

बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥
येणें सोसें मन झालें हांवभरी । परत माघारी येत नाहीं ॥
बंधनापासूनी उंकलली गांठी । देत आलों मिठी सावकाश ॥
तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें । कामक्रोधें केलें घर रितें[११] ॥

१९०. मी तुम्हांस जीव वाहूं म्हटलें तरि तोही तुमचाच आहे.

वर्णूं महिमा ऐसी नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा॥

---

१ ओंकारी २ दगड. ३ अस्वल. ४ शोधणें. ५ अशक्य. ६ सूर्याचें तेज. ७ अग्नि. ८ हांव. ९ इच्छेनें युक्त. १० सुटणें. ११ रिकामें.

ठायींची हे काया ठेविली चरणीं। आतां ओंवाळुनि काय सांडूं ॥
नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा। जीव वाहूं देवा तोही तुझा ॥
मज माझें कांहीं न दिसे पाहतां। तें तुज अनंता समर्पावें ॥
तुका म्हणे आतां नाहीं मज थार। तुझे उपकार फेडावया ॥

१९१. करुणा भाकणें ही सुद्धां स्वप्नांतीलच गोष्ट होय.

स्वप्नींचिया गोष्टी। मज धरिलें होतें वेठी।
जालिया सेवटीं। जागे लटिकें सकळ।
वायां भांकिली करुणा। मूळ पावावया सिणा ॥
राव रंक राणा[1]। कैंचा स्थानावरी आहे ॥
सोसिलें तें अंगे। खरें होतें न्हतां जागें।
अनुभवही सांगे। दुःखें डोळे उघाडिले ॥
तुका म्हणे संतीं। [2]सावचित केलें अंतीं।
नाहीं तरी होती। [3]टाळी बैसोनि राहिली ॥

१९२. आमच्या सर्व इच्छा पुरविणारा नारायण असल्यानें आम्हीं दुसऱ्यास काकुळतीस कां यावें ?

तैसे न्हों आम्ही विठोबाचे दास। यावें आणिकांस काकुलती ॥
स्वामिचिया सत्ता ठेंगणें सकळ। आला काळिकाळ हाताखालीं ॥
अंकितांचा असे अभिमान देवा। समर्पूनि हेवा असों पायीं ॥
तुका म्हणे आम्हां इच्छेचें खेळणें। कोड नारायणें पुरवावें ॥

१९३. आम्हीं सुखदुःखें देवास समर्पण करून काळ नाहींसा केला.

करूनि चिंतन खेळों भोंवतालें। चित्त येथें आलें पायांपाशीं ॥
येथें नाहीं खोटा चालत परिहार। जाणसी अंतर पांडुरंगा ॥

१ राजा. २ सावधान. ३ दांतखिळी. ४ समर्थन.

सुखदुःखें तुज देऊनि सकळ । नाहीं ऐसा काळ केला आम्हीं ॥
तुका म्हणे झाला देहाचा विसर । आतां आपपर नाहीं दोन्ही ॥

१९४. जगास खाणाऱ्या काळाच्या माथ्यावर आम्हीं पाय दिला.

जगा काळ खाय । आम्हीं माथां दिले पाय ॥
नाचों तेथें उभा राहे । जातां [1]व्यंग करी साहे ॥
हरीच्या गुणें धाला । होता खातची भुकेला ॥
तुका म्हणे हळु । झाला कढत शीतळु ॥

१९५. निशा नाहींशी होऊन निद्रेचा संपूर्ण नाश झाला.

[2]हारपोनि गेली [3]निशी । निद्रा कैसी न देखों ॥
नारायणीं बसलें घर । निरंतर आनंद ॥
अवघा [4]रुंधविला [5]ठाव । नेला [6]वाव मी माझें ॥
तुका म्हणे एके ठायीं । असूं, नाहीं क्षण भिन्न ॥

१९६. मी माझें मरण आपल्या डोळ्यांनीं पाहिलें.

आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाला सोहळा अनुपम्य ॥
आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ॥
एकदेशी होतों अहंकारें [7]आथिलों । त्याचा त्यागें झाला सुकाळ हा ॥
फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझ्या संकोचें दुरी झालों ॥
नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥
तुका म्हणे दिलें उमटूनि जगीं । घेतलें तें अंगीं लावूनियां ॥

---

१ कमी, उणे. २ नाहींसें होणें. ३ रात्र. ४ व्यापणें. ५ जागा. ६ व्यर्थ. ७ युक्त.

## १९७. शरीराची प्रेतयात्रा.

झाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव श्मशानींचा ॥
रडती रात्रंदिवस कामक्रोधमाया । म्हणती हायहाय यमधर्मे ॥
वैराग्याच्या शेंणी[1] लागल्या शरीरा । ज्ञानाग्नि लागला ब्रह्मत्वेंसी ॥
फिरविला घट फोडिला चरणीं । महावाक्यध्वनि बोंब झाली ॥
दिली तिळांजुळि कुळनामरूपासी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥
तुका म्हणे रक्षा झाली आपींआप । उजळीला दीप गुरुकृपा ॥

## १९८. माझ्या मरणानें देवाची वसति देहांत झाली आहे.

ऐकवेळे[2] केलें रिते कलिवरें[3] । आतां दिली थार पांडुरंगा ॥
पाळण पोषण न लगे ते सोई । देहाचे ते काई सर्व भाव ॥
माझिया मरणें झाली हे वसती । लागली ते ज्योती अविनाश ॥
झाला ऐसा एका घायें येथें नाहीं । तुका ऐसें कांहीं बोलों नये ॥

## १९९. देहातीताचीं लक्षणें.

आम्हीं मेलों तेव्हां देह दिला देव । आतां करूं सेवा कोणाची मी ॥
सूत्रधारी जैसा हालवितो कळा । नाचतो पुतळा नाना छंदें ॥
बोलतसे जैसें बोलवितो देव । मज हा संदेह कासयाचा ॥
पाप पुण्य ज्याचें तोचि जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आम्हांसवें ॥
तुका म्हणे तुम्हीं आइका हो मात । आम्ही या अंतीत[5] देहाहूनि ॥

## २००. आलेल्या जन्माचें सार्थक झालें !

पाळिला विधि तो आजि फळा आला । ऐसा हा कळला साच भाव ॥
नामाची आवडी लागलीसे चित्ता । पाय आठवितां सुख वाटे ॥

---

१ गोवऱ्या. २ एकदम. ३ शरीर. ४ आश्रय. ५ वेगळे.

धरिल्या देहाचें साधलें कारण । पुढिल्या खंडण गर्भवासा ॥
तुका म्हणे लाभ झाला एकसरें[1] । आणिक दुसरें नाहीं आतां ॥

२०१. समर्थ आमचा कैवारी असल्यानें आमचें दुर्बलत्व नाहींसें झालें आहे.

आतां मी सर्वथा नव्हे गा दुर्बळ । यातिहीन कूळ दैन्यवाणा[2] ॥
मायें[3] रखुमाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष[4] दोन्ही ॥
दुष्ट नव्हों आम्ही अभागी अनाथ । आमुचा समर्थ कैवारी हा ॥
बापुडा मी नव्हें दुर्बळ ठेंगणा । पांगिला[5] हा कोणा आणिकांसी ॥
संवसार आम्हां सरला सकळ । लपोनियां काळ ठेला धाकें ॥
तुका म्हणे झालों निर्भर[6] मानसीं । जोडलिया रासी सुखाचिया ॥

२०२. पित्याचें जें धन त्यापासून पुत्रास हिरावणारा कोण?

भावबळें विष्णुदास । नाहीं नाश पावत ॥
योगभाग्यें घरा येतीं । सर्वशक्ति चालत ॥
पित्याचें जें काय धन । पुत्रा कोण वंचीलें[7] ॥
तुका म्हणे कडे बैसों । तेथें असों निर्भर ॥

२०३. तुकाराम एकाएकीं मिराशीचा धनी होतो.

बाप करी जोडी[8] लेकराचे ओढी[9] । आपुली करवंडी[10] वाळवूनी ॥
एकाएकी केला मिरासीचा धनी । कडिये वागवूनि भार खांदीं ॥

१ एकदम. २ दीन. ३ आई. ४ कुळ. ५ ओशाळा, अंकित. ६ निष्काळजी. ७ फसवणें. ८ धनसंचय. ९ लोभ. १० शरीर, काया.

लेवऊनि पाहे डोळां अलंकार । ठेवा दावी थोर करूनियां ॥
तुका म्हणे नेदीं गांजूं आणिकांसी । उदार जीवासी आपुलिया ॥

## २०४. भांडाराची किल्ली त्याचे हातीं येते.

एकांतीं लोकांतीं करूं गदारोळ । लेश तोही मळ नाहीं येथें ॥
घ्यावें द्यावें आम्हीं आपुलिया सत्ता । न देखों पुसतां दुजा कोणी॥
भांडाराची किल्ली माझे हातीं आहे । पाहिजे तो पाहे वाण येथें ॥
तुका म्हणे आम्हां विश्वासाच्या बळें । ठेविलें मोकळें देवें येथें ॥

## २०५. अनंताच्या पिकाची वांटणी.

नाहीं येथें वाणी । सकळां वर्णीं घ्यावी धणी ॥
झालें दर्पणाचें अंग । ज्याचा त्यासी दावी रंग ॥
एकाभावाचा एकांत । पीक पिकला अनंत ॥
तुका म्हणे दानी । करी बैसोनि वांटणी ॥

## २०६. उत्पत्तीचें बीज हस्तगत होतें.

ठेविलें जतन । करूनियां निजधन ॥
जयापासाव उत्पत्ति । तें हें बीज धरिलें हातीं ॥
निवडिलें वरळा भूस । सार आईन जिन्नस ॥
तुका म्हणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥

## २०७. तुकारामाचें अनुभवसाम्राज्यावर आरोहण.

शोधूनि अन्वय वंश वंशावळी । परस्परा कुळीं उच्चारण ॥
म्हणविलें मागें पुढें चाले कैसें । केला सामरस्यें अभिषेक ॥

---

१ गजर. २ माल, प्रकार. ३ तोटा. ४ जातींनीं. ५ आरसा. ६ दान देणारा. ७ फोल व ऐन जिन्नस. ८ कुळ.

एकछत्र झळके उन्मनीं निशाणी । अनुहातध्वनि गगन गर्जे ॥
तुकयास्वामी स्थापी निजपदीं दासा । करूनि उल्हासा सप्रेमता ॥

## २०८. तुकाराम एकाएकीं देवच होतो.

भक्तीचिया पोटीं रत्नाचिया खाणी । ब्रह्मींची ठेवणी[1] सकळ वस्तु ॥
माउलीचे मागें बाळकांची हारी । एका सूत्रें दोरी ओढतसे ॥
जेथील जें मागे तें रायासमोर । नाहींसें उत्तर येत नाहीं ॥
सेवेचिये सत्ते धनीच सेवक । आपुलें तें येक न वंची कांहीं ॥
आदि अंता ठाव असे मध्यभाग । भोंवतें भासे जग उंचासनीं ॥
भावारूढ तुका झाला एकाएकीं । देवच लौकिकीं अवघा केला ॥

## २०९. तुकारामाचे बोल म्हणजे देवाचेच बोल होत.

नेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल । विनवितो कोपाल[3] संत झणी[2] ॥
नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंगें व्यापुनिया ॥
मज मूढा शक्ति कैंचा हा विचार । निगमादिकां[4] पार बोलावया ॥
रामकृष्णहरि मुकुंदा मुरारि । बोबड्या उत्तरीं हेंचि ध्यान ॥
तुका म्हणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥

## २१०. भावारूढ तुका ही विठोबाचीच मुद्रा आहे.

प्राक्तनाच्या[5] योगें आळशावरी गंगा ॥ स्नान काय जगा करूं नये ॥
उभी कामधेनु मांगाचे अंगणीं । तिसीं काय ब्राह्मणीं वंदूं नये ॥
कोडियाचे हातें परिसें होय सोनें । अपवित्र म्हणोन घेऊं नये ॥
यातिहीन झाला गांवींचा मोकासी[6] । त्याच्या वचनासी मानूं नये ॥
भावारूढ तुका मुद्रा विठोबाची । न मनीं तयांची तोंडें काळीं ॥

---

१ ठेवलेली. २ रांग. ३ रागावूं नका. ४ वेद. ५ प्रारब्ध, दैव. ६ इनामदार.

२११. माझी वाणी ही देवाचीच प्रासादिक वाणी होय.

वचनाचा अनुभव हातीं । बोलवितो देव मज ॥
परि हें न कळे अभाविकां । जडलोकां[1] जिवांसी ॥
अनुश्रुत[2] हे प्रासादिक । कृपा भीक स्वामीची ॥
तुका म्हणे वरावरी[3] । जातों तरी सांगत ॥

२१२. स्वतःच्या बळानें मी बोलत नसून देवाच्याच बळानें बोलत आहे.

आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा कृपावंत वाचा त्याची ॥
साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी । शिकविता धनी वेगळाचि ॥
काय म्यां पामरें[4] बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायांविण ॥

२१३. मला देव बोलवितो यांत संशय नाहीं.

संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें[6] जाणावें हें ॥
विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ॥
करितों कवित्व बोबड्या उत्तरीं । झणीं मजवरी कोप धरा ॥
काय माझी याति नेणां हा विचार । काय मी तें फार बोलों नेणें ॥
तुका म्हणे मज बोलवितो देव । अर्थ गुह्य भाव तोचि जाणे ॥

२१४. माझें कवित्व हें विश्वंभराचेंच कवित्व होय.

करितों कवित्व म्हणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥
माझिये युक्तीचा[5] नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ॥

१ मूर्ख. २ अश्रुत, पूर्वी कोणी न ऐकलेली. ३ वरचेवर, पुनः पुनः. ४ हीन, दीन. ५ युक्ति, चातुर्य. ६ अडाणी, गांवढळ.

काय मी पामर जाणे अर्थभेद । वदवी गोविंद तेंचि वदें ॥
निमित्त मापासी बैसविलों आहे । मी तों कांहीं नव्हे स्वामिसत्ता ॥
तुका म्हणे आहें पाइकाचि[1] खरा । वागवितों मुद्रा[2] नामाची हे ॥

२१५. माझी वाणी नारायणानें मिश्रित असते.

वदे साक्षत्वेंसीं वाणी । नारायणीं मिश्रित ॥
नलगे कांहीं चांचपावें । जातों भावें पेरीत ॥
भांडार त्या दातयाचें । मी कैचें ये ठायीं ॥
सादावित[3] गेला तुका । येथें एकाएकीं तो ॥

२१६. माझें शब्द पर्जन्याप्रमाणें सर्वत्र सम आहेत.

चोराचिया धुडुका[4] मनीं । वसे ध्यानीं लांछन[5] ॥
यासी आम्ही करणें काय । वर्षों न्यायें पर्जन्य ॥
ज्याच्या बसे खतांवरी[6] । तें चुरचुरी दुखवूनि ॥
तुका म्हणे ज्याची खोडी । त्याची जोडी त्या पीडी ॥

२१७. आतां मी केवळ उपकाराकरितांच राहिलों आहे.

अणुरेणुयां थोकडा[7] । तुका आकाशाएवढा ।
गिळुनि सांडिलें कळिवर[8] । भवभ्रमाचा आकार ॥
सांडिली त्रिपुटी[9] । दीप उजाळिला घटीं ॥
तुका म्हणे आतां । उरलों उपकारापुरता ॥

---

१ शिपाई, सेवक. २ चिन्ह, शिक्का. ३ सावध करणें, हांका मारणें. ४ धडकी. ५ काळिमा. ६ क्षत, व्रण. ७ लहान. हा अभंगाचा चरण जणूं कांहीं " अणोरणीयान् महतो महीयानात्मास्य जंतोर्निहितो गुहायाम् " या उपनिषदांतलि वाक्याचें रूपांतरच आहे. ८ शरीर. ९ ध्याता, ध्येय, ध्यान, ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान, कर्ता, कार्य, कारण, इत्यादि त्रिपुटी.

२१८. धर्माचें पाळण करून अधर्माचें खंडण करणें हेंच आतां आमचें काम.

धर्माचें पाळण । करणें पाषांड[1] खंडण ।
हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥
तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे ॥
नाहीं भीड भार । तुका म्हणे सानां[2] थोर ॥

२१९. मागें जन्मोजन्मीं आम्हीं हेंच करीत आलों आहों.

मागें बहुतां जन्मीं । हेंचि करित आलों आम्हीं ।
भवतापश्रमीं[3] । दुःखें पीडिलें निववूं त्यां ॥
गर्जूं हरिचे पवाडे[4] । मेळवूं वैष्णव बागडे[5] ।
पाझर रोकडे । काढूं पाषाणामध्यें ॥
भावशुद्ध नामावळी । हर्षें नाचूं पिटूं टाळी ।
घालूं पायातळीं । कळिकाळ त्या बळें ॥
कामक्रोध बंदिखानीं[6] । तुका म्हणे दिले दोन्ही ।
इंद्रियांचे धनी । आम्ही जालों गोसावी ॥

२२०. तुक्याचें दर्शन झालें नाहीं तोंपर्यंतच भोंदू गुरूंचा बाजार.

तोंवरि तोंवरि जंबुकें[7] करी गर्जना ।
जंव त्या पंचानना[8] देखिलें नाहीं ॥
तोंवरि तोंवरि सिंधु करी गर्जना ।
जंव त्या अगस्तिब्राह्मणा देखिलें नाहीं ॥
तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी ।

---

१ नास्तिकपणा. २ लहान. ३ संसारतापाच्या श्रमानें. ४ कीर्ति. ५ भोळे. ६ कैदखाना. ७ कोल्हा. ८ सिंह.

जंव सुंदर वनिता दृष्टी देखिली नाहीं ॥
तोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टी ।
जंव परमाई[1]चा पुत्र दृष्टी देखिला नाहीं ॥
तोंवरि तोंवरि माळामुद्रांचीं भूषणें ।
जंव तुक्याचें दर्शन झालें नाहीं ॥

२२१. तुक्याची भेट झाली नाहीं तोंपर्यंतच संतांच्या गोष्टी !

तोंवरि तोंवरि शोभतील गारा । जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥
तोंवरि तोंवरि शोभती दीपिका । नुगवतां एका भास्करासी ॥
तोंवरि तोंवरि सांगती संतांचिया गोष्टी । जंव नाहीं भेटी तुक्यासवें ॥

२२२. आम्हीं हरीचे जुने संवगडी आहोंत.

आम्ही हरीचे संवगडे[2] । जुने[3] ठायींचे[3] वेडे बागडे ।
हातीं धरुनि कडे । पाठीसवें वागविलों ॥
म्हणोनि भिन्न भेद नाहीं । देवा आम्हां एक देहीं ।
नाहीं झालों कहीं । एका एक वेगळे ॥
निद्रा करितां होतों पायीं । सवेंचि[4] लंका घेतली तेंई[5] ।
वानर, गोवळ गाई । सवें चारित फिरतसों ॥
आम्हां नामाचें चिंतन । रामकृष्ण नारायण ।
तुका म्हणे क्षण । खातां जेवितां न विसंबों ॥

२२३. शुकानें समाधि लाविली त्यावेळेस मी हजर होतों.

ब्रह्मज्ञान जरि एके दिवशीं कळे । तात्काळ हा गळे अभिमान ॥
अभिमान लागे शुकाचिये पाठीं । व्यासें उफराटी[6] दृष्टी केली ॥

---

१ वीराला प्रसवणारी माता. २ सोबती. ३ मूळस्थानाचे. ४ बरोबरच.
५ तेव्हां. ६ उलट.

जनकभेटीसी पाठविला तेणें । अभिमाननाणें खोटें केलें ॥
खोटें करूनियां लाविला अभ्यासीं । मेरुशिखरासी शुक गेला ॥
जाउनियां तेणें साधिली समाधी। तुका म्हणे [1]तधीं होतों आम्ही ॥

२२४. खऱ्याखोट्याचा निवाडा करण्याकरितांच आमचा जन्म.

उज[2]ळावया आलों वाटा । खरा खोटा निवा[3]डें ॥
बोलविले बोलें बोल । धनी विठ्ठल सन्निध ॥
तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामीच्या ॥
तुका म्हणे नये आम्हां । पुढें कामा ग[4]बाळ ॥

२२५. आम्हीं नामाचे धारक असून दुसऱ्यांचे तारकही आहो.

कांस घालोनि बळकट । झालों कळिकाळासी नीट ।
केली पायवाट । भव[5]सिंधूवरूनि ॥
या रे या रे लहान थोर । याती भलते नारी नर ।
करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥
कामीं गुंतले रिकामे । जपी तपी येथें जमे ।
लाविले द[6]मामे । मुक्त आणि मुमुक्षा ॥
एकंदर शिक्का । पाठविला येही लोका ।
आलों म्हणे तुका । मी नामाचा धारक ॥

२२६. मागें झालें असेल त्याची मी तुम्हांस क्षमा करीत आहें.

मागें नेणपणें घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करूनिया ॥
परनारीचें जया घडेल गमन । दावितो वदन जननीरत ॥

---

१ त्यावेळेस. २ प्रकाशित करणें. ३ निर्णय. ४ टाकाऊ, मूर्ख. ५ संसार-समुद्रावरून. ६ नगारा, नौबत.

उपदेशावरी मन नाहीं हातीं । तो आम्हां पुढतीं पाहूं नये ॥
तुका म्हणे साक्षी असों द्यावें मन । घातली ते आण पाळावया ॥

## २२७. मागें न पहातां पुढें पहा.

चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥
तुज पापाचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळी वसे ॥
पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां न लगे घडी[1] ॥
केलीं मागें नका पाहों । तुज जैमान[2] आम्हीं आहों ॥
करी तुजसी करत्रतीं । आणिक नामें घेऊं किती ॥
तुका म्हणे काळा । रीग[3] नाहीं निघती ज्वाळा ॥

## २२८. मी तुम्हांस देवाचा निरोप आणिला आहे.

सेवितों हा रस वांटितो आणिकां । घ्या रे होऊं नका रानभरी ॥
विटेवरी ज्याची पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ॥
मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धि याचे पायीं ॥
तुका म्हणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥

## २२९. आम्हीं वैकुंठवासी असून भक्तीचा डांगोरा पिटण्यास्तवच आमचा अवतार आहे.

आम्हीं वैकुंठवासी । आलों याचि कारणासी ।
बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया[4] ॥
झाडूं संतांचे मारग । आडरानीं भरलें जग ।
उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥

---

१ घटिका. २ जामीन. ३ प्रवेश. ४ वागण्याकरतां.

अर्थे लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें।
विषयलोभीं मनें। साधनें बुडविलीं ॥
पिटूं भक्तीचा [1] डांगोरा। कळिकाळासी [2] दरारा।
तुका म्हणे करा। जयजयकार आनंद ॥

---

१ नगारा, डंका. २ भीति.

# ५. साधनपूर्वरंग.

## २३०. साधकाची दशा कशी असावी?

साधकाची दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाहीं ॥
लोलुप्यता[1] काय निद्रेसी जिंकावें । भोजन करावें परिमितें[2] ॥
एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण । प्राण गेल्या जाण बोलों नये॥
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे[3] गुरुकृपा ॥

## २३१. यमनियम.

निर्वाहापुरतें अन्नआच्छादन । आश्रमासी स्थान कोपी[4] गुहा ॥
कोठेंही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण सांठवावा ॥
नये बोलों फार बैसों जनामधीं । सावधानबुद्धी इंद्रियें दमी ॥
तुका म्हणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणाची गोवी[5] उगवोनि[6] ॥

## २३२. एकांतवासाचें महत्व.

तरि कां नेणते होते मागें ऋषि । तींहीं या जगासी दुराविलें ॥
वोळगती[7] जया अष्टमादि सिद्धी । ते या जनबुद्धी नातळती[8] ॥
कंदमुळें पाला धातूच्या पोषणा । खाती वास राना तरी केला ॥
लावुनिया नेत्र उगेचि बैसले । न बोलत ठेले मौन्यरूप ॥
तुका म्हणे ऐसें करीं माझ्या चित्ता । दुरावीं अनंता जन दुरी ॥

---

१ आसक्ति. २ मोजकें. ३ मिळवितो. ४ झोंपडी. ५ गुंतागुंत, अडचण. ६ उकलणें. ७ सेवा करणें. ८ सांपडले नाहींत.

## २३३. अभ्यासास कांहींही दुष्कर नाहीं.

ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । अभ्यासासी [illegible] कार्यसिद्धि ॥
नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कईवाड[1] तोंचि वरि ॥
दोरें चिरा कापे पडिला कांचणीं[2] । अभ्यासें सेवनीं विष पडे ॥
तुका म्हणे कैंचा बैसण्यासी ठाव । जठरीं[3] बाळा वाव एकाएकीं ॥

## २३४ अभ्यासानें असाध्यही साध्य होतें.

साधूनी बचनाग[4] खाती तोळा तोळा । आणिकांतें डोळां न पाहवे ॥
साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपतीं देखोनियां ॥
असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥

## २३५. अवघे गाबाळ सारून एकांतवासांत आनंदाचा उपभोग घ्या.

एकविध नारायण । तेथें विषमाचा सीण ॥
पालटोंचि भिन्न । नये अणुप्रमाण ॥
अवघें सारावें गाबाळ[5] । चुकवूनियां कोल्हाळ[6] ॥
आनंदाचें स्थळ । एकाएकीं एकांत ॥
कायावाचामन । स्वरूपींच अनुसंधान ॥
लक्ष[7] भेदी बाण । तेणें पाडें लवलाहो[8] ॥
तुका म्हणे आळस निद्रा । येथें देऊनियां चिरा[9] ।
देऊनियां धीरा । मिठी जाणा जागृती ॥

---

१ निश्चय. २ घर्षण. ३ पोट. ४ एक विषारी मुळी. ५ केरकचरा. ६ गोंगाट, कटकट. ७ लक्ष्य. ८ त्वरा. ९ दगड घालणें, नाहींसें करणें.

### २३६. प्रपंच व परमार्थ दोन्हीं करणें शक्य नाहीं.

प्रपंच परमार्थ संपादीन दोन्हीं । एकही निदानीं न घडे त्यासी ॥
दोही पै[2]वांवरी ठेवूं जातां हात । होय अपघात शरीराचा ॥
तुका म्हणे तया दोहींकडे धक्का । शेव[1]टीं तो नरकामाजी पडे ॥

### २३७. त्यागावांचून भोग सुटत नाहीं.

हो कां पुत्र पत्नी बंधु । त्यांचा तोडावा संबंधु ॥
कळों आलें खटं[3]याळसें । शिवों नये लिंपों दोषें ॥
फोडावें मडकें । मेले लें[4]खी घायें एकें ॥
तुका म्हणे त्यागें[5]- । विण चुकिजेना भोगें ॥

### २३८. प्रियापुत्रबंधूंचा संबंध सोडावा.

जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥
येरें[6] प्रियां[7]पुत्रधना कोण लेखा । करितीं तीं दुःखा पात्र शत्रु ॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदु भरतें केली ॥
तुका म्हणे सर्व धर्म हरिचे पाय । आणिक उपाय दुःखमूळ ॥

### २३९. पतंगाप्रमाणें ज्योतींत उडी घालूं नये.

[8]थडियेसीं निघतां पाषाणाच्या सांगडी ।
बुडतां मध्यभागीं तेथें कोण घाली उडी ॥
न करीं रे तैसा आपआपणिया ।
पतंग जाय वायां जीवें ज्योती घालूनियां ॥
सावधपणें सोमल वाटी भरोनियां प्याला ।

---

१ शेवटीं. २ धान्य सांठवण्याची कणगी. ३ वाईट. ४ समज. ५ त्याग करणें. ६ इतर. ७ स्त्री. ८ तीर.

मरणाअंतीं वैद्य बोलाविती वहिला[1] ॥
तुका म्हणे करीं रे ठायींचाचि विचार ।
जंव नाहीं पातला यमाचा किंकर ॥

२४०. सर्व लिगाडें सारून सुपंथ धरावा.

सारावीं लिगाडें[2] धरावा सुपंथ । जावें उसंतीत[3] हळूं हळूं ॥
पुढें जातियांचे[4] उमटले माग । भांबावलें जग आडरानें ॥
वेंचल्याचा पाहे वरावरि झाडा । बळाचा निधडा पुढिलिया ॥
तुका म्हणे जैसी दाखवावी वाणी । ते द्यावी भरोनी शेवट तों ॥

२४१. इहलोकींच्या धुरानें डोळे अंध होऊं देऊं नयेत.

क्षणक्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधु ॥
नाशिवंत देह जाणार सकळ । आयुष्य खातो काळ सावधान ॥
संतसमागमीं धरावी आवडी । करावी तांतडी[5] परमार्थी ॥
तुका म्हणे इहलोकींच्या[6] वेव्हारें । नये डोळे धुरें भरूनि राहों ॥

२४२. झाडें ओरपून पाला खाऊन रहावें.

झाडें वोरपोनि खाऊनियां पाला । आठवा विठ्ठला वेळोवेळां ॥
वल्कलें नेसुनि ढुंगा गुंडाळूनि । सांडी देहभान जवळुनी ॥
लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोसाठीं ॥
सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य[7] । सेवावें अरण्य एकांतवास ॥
ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका म्हणे त्याचा पांग[8] फिटे[9] ॥

---

१ लवकर. २ लचांड. ३ आक्रमणें, उल्लंघणें. ४ जाणाऱ्यांचें. ५ त्वरा, जलदी. ६ मृत्युलोक. ७ प्रेम. ८ उणीव, दारिद्र्य, पराधीनता. ९ दूर होणें.

२४३. ढेंकणांच्या बाजेवर सुखाची कल्पना करणें व्यर्थ होय.

संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय घडे जाणतेनो ॥
हेंडग्याच्या आळां अवघीं चिपाडें । काय तेथें गोडें निवडावीं ॥
ढेंकणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ॥
तुका म्हणे मद्य सांडवी लंगोटी । सांगितला सेटीं विचार त्या ॥

२४४. परनारी मातेसमान मानण्यांत तुमचें काय वेंचतें?

पराविया नारी माउलीसमान । मानिलिया धन काय वेंचें[2] ।
न करितां परनिंदा परद्रव्यअभिलाष । काय तुमचें यास वेंचें सांगा ॥
बैसलिये ठायीं म्हणतां रामराम । काय होय श्रम ऐसें सांगा ॥
संतांच्या वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेंचें सांगा ॥
खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेंचें यास ऐसें सांगा ॥
तुका म्हणे देव जोडे याजसाठीं । आणिक ते आटी[3] न लगे कांहीं ॥

२४५. नरस्तुति आणि कथेचा विक्रा होऊं न देण्याबद्दल देवास प्रार्थना.

नरस्तुति आणि कथेचा विकरा[4] । हें नको दातारा घडों देऊं ॥
ऐसिये कृपेची भाकितों करुणा । आहेसि तूं राणा उदाराचा ॥
पराविया नारी आणि परधना । नको देऊं मनावरी येऊं ॥
भूतांचा मत्सर आणि संतनिंदा । हें नको गोविंदा घडों देऊं ॥
देहअभिमान नको देऊं शरीरीं । चढो कांहीं परी एक देऊं ॥
तुका म्हणे तुझ्या पायांचा विसर । नको वारंवार पडों देऊं ॥

---

१ चघळलेल्या चिपाडांचा भारा. २ खर्चणें. ३ श्रम. ४ विक्री.

### २४६. व्यर्थ देहास दंडून उपयोग नाहीं.

भगवें तरी श्वान[1] सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ॥
वाढवुनि जटा फिरे दाही दिशा । तरी जंबुवेषा[2] सहज स्थिति ॥
कोरोनियां भूमी करिती मधीं वास । तरी उंदरास काय वाणी ॥
तुका म्हणे ऐसें कासया करावें । देहासी दंडावें वाउगेंचि ॥

### २४७. शरीरासारिखें वाईट नाहीं, व शरीरासारिखें चांगलें नाहीं.

शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार ।
शरीर दुर्गंधीची थार[3] । नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥
शरीर उत्तम चांगलें । शरीर सुखाचें घोसुलें[4] ।
शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधलें परब्रह्म ॥
शरीर विटाळाचें आळें । मायामोहपाश जाळें ।
पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥
शरीर सकळ ही शुद्ध । शरीर निधींचाहि निध ।
शरीरें तुटे भवबंध । वसे मध्यभागीं देव शरीरा ॥
शरीर अविद्येचा बांधा । शरीर अवगुणांचा रांधा ।
शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं गुणसुधा एक शरीरीं ॥
शरीरा सुख नेदावा भोग । न द्यावें दुःख न करी त्याग ।
शरीर चोखटें[5] ना चांग । तुका म्हणे वेग करी हरिभजनीं ॥

### २४८. पूज्यतेनें सुख मानणारा मनुष्य मूर्ख होय.

देहबुद्धि वसे जयाचिये अंगीं । पूज्यता ते जगीं सुख मानी ॥
थोर असे दगा झाला त्यासी हाटीं[6] । सोडोनियां गांठी चोरीं नेली ॥
गांठींचें जाऊनि नव्हे तो मोकळा । बांधविलासे गळा दंभलोभें ॥

---

१ कुत्रें. २ कोल्हा. ३ आश्रय. ४ घड. ५ वाईट. ६ बाजार.

पुढिल्या उदिमा[1] झालेंसे खंडण । दिसे नागवण[2] पडे गांठीं ॥
तुका म्हणे ऐसें बोलतील संत । जाणूनियां घात कोण करी ॥

२४९. सुखदुःखास समान लेखावें.

कैं वाहावें जीवन[3] । कैं पलंगीं शयन ॥
जैसी जैसी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ॥
कैं भोज्य नानापरी । कैं कोरड्या भाकरी ॥
कैं बसावें वाहनीं । कैं पायीं अनवाणी ॥
कैं उत्तम प्रावणें[4] । कैं वसनें तीं जीर्णें ॥
कैं सकळ संपत्ती । कैं भोगणें विपत्ती ॥
कैं सज्जनाचा संग । कैं दुर्जनाचा योग ॥
तुका म्हणे जाण । सुख दुःख तें समान ॥

२५०. परोपकाराविषयींही खोटें बोलूं नये.

असत्य वचन होता सर्व जोडी । जरी लग्नघडी परउपकार ॥
जाईल पतना यासि संदेह नाहीं । साक्ष आहे कांहीं सांगतों ते ॥
वदविलें मुखें नारायणें धर्म । अंगुष्ठ त्या कर्मासाठीं गेला ॥
तुका म्हणे आतां सांभाळा रे पुढें । अंतरींचें कुडें[6] देईल दुःख ॥

२५१. बाहेर धुऊन काय उपयोग? आंतून शुद्ध झालें पाहिजे.

काय धोविलें बाहेरी । मन मळलें अंतरीं ।
गादलें[7] जन्मवरी । असत्यकांटें[8] कीटलें[9] ॥
सांडी व्यापार दंभाचा । शुद्ध करीं रे मन वाचा ॥
तुझिया चित्ताचा । तूंच ग्वाही आपुला ॥

---

१ व्यापार, उद्योग. २ जवळची उत्तम वस्तु घालवून उघडें होणें. ३ पाणी. ४ वस्त्र. ५ वस्त्रें. ६ वाईट. ७ भरणें. ८ कीट, मळ. ९ मळलें.

पापपुण्य विटाळ देहीं । करितां न विचारिसी कांहीं ।
काय चांचपसी मही । जी अखंड सोंवळी ॥
कामक्रोधावेगळा । ऐसा होई कां सोंवळा ।
तुका म्हणे कळा । गुंडून ठेवीं या कुसरी[1] ॥

२५२. तीर्थास जाऊन केवळ वरवर चर्म प्रक्षाळण्याचा काय उपयोग?

जाउनियां तीर्था काय तुवां केलें । चर्म[2] प्रक्षाळिलें वरी वरी ॥
अंतरींचें शुद्ध कासयानें झालें । भूषण त्वां केलें आपणया ॥
वृंदावन[3]फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचिना ॥
तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदों[4] तुम्ही ॥

२५३. देवास भेटण्याचा एकच उपाय.

येथें दुसरी न सरे आटी । देवा भेटी जावया ॥
तोचि ध्यावा एकचित्तें । करूनि रितें कळिवर[5] ॥
षड्उर्मी[6] हृदयांत । यांचा अंत पुरवूनि ॥
तुका म्हणे खुंटे आस[7] । तेथें वास करी तो ॥

२५४. केवळ निष्काम झाल्यानेंच राम मिळतो.

लय लक्षूनियां झालों म्हणती देव । तोही नव्हे भाव सत्य जाणा ॥
झालों बहुश्रुत नलगे आतां कांहीं । नको राहूं तेही निश्चितीनें ॥
तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥
कर्म आचरणें यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥
तुका म्हणे जरी होईल निष्काम । तरिच होय राम देखे डोळा ॥

---

१ कसब, युक्ति. २ कातडें. ३ एक कडू फळ. ४ घमेंड करणें. ५ शरीर. ६ कामक्रोधादिक मनांतील तरंग. ७ इच्छा.

२५५. मातेच्या खांद्यावर बाळास शीण होतो काय ?

नको सोडूं अन्न नको सेवूं वन । चिंती नारायण सर्व भोगी ॥
मातेचिये खांदीं बाळ नेणें सीण । भावना त्या भिन्न मुंडाविया ॥
नको गुंफों भोगीं नको पडों त्यागीं । लावुनि सरे अंगीं देवाचीया ॥
तुका म्हणे नको पुसूं वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाहीं ॥

२५६. " देव जोडे ते करावे अधर्म । अंतरें तें कर्म नाचरावें. "

न मनावें तैसें गुरूचें वचन । जेणें नारायण अंतरे तें ॥
आड आला म्हणुन फोडियेला डोळा । बळिनें आंधळा शुक्र केला॥
करी देव तरी काय नव्हे एक । कां तुम्ही पृथक् सिणा वायां ॥
उल्लंघुनियां भ्रताराची आज्ञा । अन्न ऋषिपत्न्या घेउनि गेल्या ॥
अवघेचि त्यांचें देवें केलें काज । धर्म आणि लाज राखियेली ॥
पितियासी पुत्रें केला वैराकार । प्रल्हादें असुर मारविला ॥
बहुत विघ्नें केलीं तया आड । परि नाहीं कैवाडें सांडियेला ॥
गौळणी करिती देवाशीं व्यभिचार । सांडुनी आचार भ्रष्ट होती ॥
तयांसी दिलें तें कवणासी नाहीं । अवघा अंतर्बाहीं तोचि झाला ॥
देव जोडे तरी करावे अधर्म । अंतरें तें कर्म नाचरावें ॥
तुका म्हणे हा तो जाणतो कळवळा । म्हणोनि अजामेळा उद्धरिलें ॥

२५७. भेटणार असशील तर संतांसच भेट.

घेसी तरी घेंई संतांची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥
सर्वभावें त्यांचें देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ॥
करिशील तो करी संतांचा सांगात । आणीक ते मात नको मना ॥
जासी तरी जांई संतांचिया गांवा । होईल विसांवा तेथें मना ॥
तुका म्हणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेंई ॥

---

१ मोडून टाकणें. २ भिन्न. ३ कार्य. ४ शत्रुत्व. ५ निश्चय. ६ गोष्ट. ७ तृप्ति.

## २५८. निश्चिंत होऊन नंतर भजन करूं म्हणशील तर ती आशा व्यर्थ आहे.

म्हणसी होऊनि निश्चिंता । हरूनियां अवघी चिंता ।
मगजाऊं एकांता । भजन करूं ॥
संसारसंभ्रमें आशा लागे पाठी । तेणें जीवा साटी होईल तुझ्या ।
सेकीं नोंडसील नाडसील । विषयसंगें अवघा नाडसील ।
मागुता पडसील भवडोहीं ॥
शरीर सकळ मायेचा बांधा । यासी नाहीं कदा आरांणूक ।
करिती ताडातोडी अंतर बाह्यात्कारीं । ऐसें जाती चारी दिवस वेगीं
मोलाची घडी जाते वायाविण । न मिळे मोल धन देतां कोडी ।
जागा होई करीं हिताचा उपाय । तुका म्हणे हाय करिसी मग ॥

## २५९. जड पडलें असतां भक्तांनीं देवाचें स्मरण करावें.

पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥
मग तो होऊं नेदी सीण । आड घाली सुदर्शन ॥
नामाच्या चिंतनें । बारा वाटे पळती विघ्नें ॥
तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ॥

## २६०. आतां ईश्वरध्यानावांचून मला दुसरें कांहींच नाहीं.

आणीक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें या चित्तापासुनियां ॥
पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥
पडिलें वळण इंद्रियां सकळां । भाव तो निराळा नाहीं दुजा ॥
तुका म्हणे नेत्रीं केली ओळखण । तटस्थ तें ध्यान विटेवरी ॥

---

१ मोह, भ्रान्ति. २ सरतेशेवटीं. ३ संकटांत पडणें. ४ विश्रांति, समाधान. ५ स्तब्ध, शांत.

# ६. गुरूपदेश.

२६१. जो शिष्यांस देवासमान मानतो त्याचाच उपदेश फळतो.

शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखे ॥
त्याचा फळे उपदेश । आणिकां दोष उफराटे ॥
त्याचें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देहभावीं ॥
तुका म्हणे सत्य सांगें । येवोत रागें येतील ते ॥

२६२. आपणांस पोहण्यास येत नसतां दुसऱ्यांस कांसेस लावतो यास काय म्हणावें ?

पिंडपोषकाच्या[1] जळो ज्ञानगोष्टी । झणी[2] दृष्टिभेटी न हो त्याची ॥
नाहीं संतचिन्हें उमटलीं अंगीं । उपदेशालागीं पात्र झाला ॥
पोहों नेणें कांसे[3] लाविता आणिका । म्हणावें त्या मूर्खा काय आतां ॥
शिणलें तें गेलें शिणलियापाशीं । झाली त्या दोघांसी एक गति ॥
तुका म्हणे अहो देवा दीनानाथा । दरुषण आतां नको त्याचें ॥

२६३. भोंदू गुरूंचा उपदेश.

टवकारूनी दृष्टी लावुनियां रग । दावी झगमग डोळ्यापुढें ॥
म्हणती शिष्यासी लागली समाधि । लटकीची उपाधि झकविती ॥
दीपाचिये ज्योति कोंडियेलें तेज । उपदेश सांजरात्रीमाजी ॥
रांगोळिया चौक श्रृंगारोनी ओजां[4] । आवरण पूजा यंत्र करी ॥
पडदा लावोनियां दीप चहूं कोनीं । बैसोनी आसनीं मुद्रा लावी ॥

१ शरीर. २ कदाचित्. ३ कंबर, आधार. ४ चांगल्या रीतीनें, लक्षपूर्वक.

नैवेद्यासी म्हणे करावें पक्वान्न । पात्रासी दिव्यान्न परवडी[1] ॥
झाला उपदेश कवळ[2] घ्यारे मुखीं । आपोशन शेखीं बुडविलें ॥
पाषांड करोनि मांडिली जीविका[3] । बुडवी भाविकां लोकांप्रती ॥
कायावाचामनें सोडवी संकल्प । गुरु गुरु जप प्रतिपादी ॥
शुद्ध परमार्थ बुडविला तेणें । गुरुत्वभूषणें भग भोगी ॥
विधींचा हि लोप बुडविला वेद । शास्त्रांचा हि बोध हरविला ॥
योगाची धारणा नाहीं प्राणायाम । सांडी यम नेम नित्यादिक ॥
वैराग्याचा लोप हरिभजनीं विक्षेप । वाढविलें पाप मतिलंडें ॥
तुका म्हणे गेलें गुरुत्व गुखाडी । पूर्वजांसी धाडी नरकवासा ॥

## २६४. भोंदू गुरु व खोटे शिष्य दोघेहि नरकाप्रत जातात.

गुरुमार्गामुळें भ्रष्ट झाले सर्वकाळ । म्हणती यातीकुळ नाहीं ब्रह्मीं ॥
पवित्राला म्हणती नको हा कंटक[4] । मानिती आत्मिक[5] अनामिका[6] ॥
डोहोर लोहार दासी बलुती बारा । उपदेशिती फारा रांडा पोरें ॥
कांहीं टाण्या टोण्या विप्र शिष्य होती । उघडी फजिती स्वधर्माची ॥
नसता करुनी होम[7] खाती एके ठायीं । म्हणती पाप नाहीं मोक्ष येणें ॥
इंद्रियांचे पेठे[8] भला कौल[9] देती । मर्यादा जकाती माफ केली ॥
नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणें । उपदेशुन घेणें द्रव्य कांहीं ॥
तुका म्हणे ऐसे गुरु शिष्य जाण । विठोबाची आण नरका जाती ॥

## २६५. अधिकारावांचून उपदेश देऊं नये.

नसतां अधिकार । उपदेशासी बळात्कार ।
तरि ते केले हो चार[10] । माकडा आणि गारोडी ॥

---

१ प्रकार. २ घांस. ३ उपजीविका, पोटभरणें. ४ कांटा. ५ आत्मज्ञ. ६ अंत्यजादि. ७ यज्ञ. ८ व्यवहार. ९ देवाची संमति. १० चाळे, वेड्या वेड्या कृति.

धनधान्य राज्य बोल । वृथा रंजवणें फोल ।
नाहीं तेथें ओल । बीज वेंची मूर्ख तो ॥
नये बांधों गांठीं । पदरा आणी ऐसी तुटी ।
असोन कसोटी । शिष्टाचार अनुभव ॥
उपदेसी तुका । मेघवृष्टीनें आइका ।
संकल्पासी धोका । सहज ते उत्तम ॥

---

## ७. नाममहिमा.

### २६६. रामकृष्णहरिमंत्राचें उच्चारण.

बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥
येऊनि अंतरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसलिया ॥
राम कृष्ण हरि मुकुंद मुरारी । मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥
तुका म्हणे ऐसें देईन मी दिव्य[1] । जरी होईल भाव एकविध ॥

### २६७. नामसंकीर्तनावांचून दुसरें साधनच नाहीं.

नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरींचीं[2] ॥
न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥
ठायींच बैसोनी करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥
रामकृष्णहरी विठल केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥
याविण असतां आणिक साधन । वाहतसे आण विठोबाची ॥
तुका म्हणे सोपें आहे सर्वांहुनि । शाहाणा तो धणी[3] घेतो येथें ॥

### २६८. नाम उच्चारून पुढें हरिरूप पहावें.

नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥
ऐसें धरोनियां ध्यान । मनें करावें चिंतन ॥
ब्रह्मादिकां ध्याना नये । तो कीर्तनाचे सोये[4] ॥
तुका म्हणे सार ध्यावें । मनें हरिरूप पाहावें ॥

---

१ शपथ. २ पूर्वजन्मींचीं. ३ तृप्ति. ४ मार्गानें, आधारानें.

२६९. कांहीं आघात न आल्यास चाललेला पंथ शेवटास पोंचवील.

आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन । जरि तें जतन होय देठीं ॥
नामेंचि सिद्धि नामेंचि सिद्धि । व्यभिचारबुद्धी न पवतां ॥
चालिला पंथ तो पाववील ठाया । जरि आड तया न ये कांहीं ॥
तुका म्हणे मध्यें पडतां आघात । तेणें होय घात हानि लाभा ॥

२७०. ब्रह्मानंदाच्या भरतींत हरिनामतारूचें सोत्सेक प्लवन.

लागलें भरतें । ब्रह्मानंदाही वरतें ॥
झाला हरिनामाचा तारा[1] । शीड लागलें फरारा ॥
बैसोनि सकळ । बाळ चालिले गोपाळ ॥
तुका म्हणे वाट । बरवी सांपडली नीट ॥

२७१. निजनिष्ठेनें नाम गाणें हाच अठरा पुराणींचा सिद्धांत आहे.

वेद अनंत बोलिला । अर्थ इतुलाचि शोधिला ॥
विठोबासी शरण जावें । निजनिष्ठें नाम गावें ॥
सकळशास्त्रांचा विचार । अंतीं इतुलाचि निर्धार ॥
अठरा पुराणीं सिद्धांत । तुका म्हणे हाचि हेत ॥

२७२. वेदाचा अर्थ आम्हांसच माहीत आहे.

वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । येरांनीं वाहवा भार माथां ॥
खादल्याची गोडी देखिल्यासी नाहीं । भार धन वाही मजुरीचें ॥
उत्पत्तिपाळणसंहाराचें निज । जेणें नेलें बीज त्याचे हातीं ॥
तुका म्हणे आम्हां सांपडलें मूळ । आपणचि फळ आलें हातां ॥

---

1 तारूं, नांव.

### २७३. हरिनामचिंतनामुळें कर्तव्यनिर्वर्तन.

जाणावें तें काय नेणावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥
करावें तें काय न करावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥
बोलावें तें काय न बोलावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥
जावें तें कोठें न जावें तें आतां । बरवें आठवितां नाम तुझें ॥
तुका म्हणे तूं करिसी तें सोपें । पुण्यें होती पापें आमुच्या मतें ॥

### २७४. मस्तक फुटलें तरी नामस्मरण सोडूं नये.

साता दिवसांचा जरी झाला उपवासी । तरी कीर्तनासी टाकूं नये ॥
फुटो हें मस्तक तुटो हें शरीर । परि नामाचा गजर सोडूं नये ॥
शरीराचे होत दोन्ही तेही भाग । परि कीर्तनाचा रंग सोडों नये ॥
तुका म्हणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव असे ॥

### २७५. नामस्मरणामुळें होणारे लाभाचे शकुन.

नाम घेतां मन निवे । जिव्हे अमृताचि स्रवे[1] ।
होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥
मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें ।
केलिया विठ्ठलें । ऐसी कृपा जाणावी ॥
झालें भोजनसें दिसे । चिरा पडोनि ठेला इच्छे ।
धालियाच्या[2] ऐसे अंगा । येती उद्गार ॥
सुख भेटों आलें सुखा । निध सांपडला मुखा ।
तुका म्हणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥

### २७६. प्रेमरसामुळें अंगकांतीचें सतेजत्व.

नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ॥

---

१ वाहणें. २ तृप्त झालेला.

गोड हें गोमटें[1] अमृतासी वाड । केला कईवाड[2] माझ्या चित्तें ॥
प्रेमरसें झाली पुष्ट अंगकांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥
तुका म्हणे तेथें विकाराची मात । बोलों नये हित सकळांचें ॥

२७७. नामस्मरणामुळें मनोवाक्कायप्रक्षालन.

झाली होती काया । बहुत मळिण देवराया ॥
तुझ्या उजळली नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥
अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा नितोडा[3] ॥
तुका म्हणे देह पायीं । ठेवुनि झालों उतराई ॥

२७८. नामाच्या बळानें षडूर्मीचा जय.

नाहीं कंटाळलों परि वाटे भय । करावें तें काय न कळतां ॥
जन वन आम्हां समानचि झालें । कामक्रोध केले पावटणी[4] ॥
षडूऊर्मी[5] शत्रु जिंकिले अनंता । नामाचिया सत्ताबळें तुझ्या ॥
मुख्य धर्म आम्हां सेवकांचा ऐसा । स्वामी करी शिरसा पाळावें तें ॥
म्हणऊनी तुका अवलोकुनी पाय । वचनाची पाहे वास[6] एका ॥

२७९. रामनामानें जीवन्मुक्तता कशी येते ?

राम म्हणे वाट चाली । यज्ञ पाउलापाउलीं ॥
धन्य धन्य तें शरीर । तीर्थांव्रतांचें माहेर ॥
राम म्हणे करितां धंदा । सुख समाधि त्या सदा ॥
राम म्हणे ग्रासोग्रासीं । तोचि जेविला उपवासी ॥
राम म्हणे भोगी त्यागी । कर्म न लिंपे त्या आंगीं ॥
ऐसा राम जपे नित्य । तुका म्हणे तोचि जीवन्मुक्त ॥

---

१ मोठें. २ निश्चय. ३ संबंध तुटणें. ४ पायरी. ५ मनाचे तरंग. ६ वाट.

## २८०. इतर कोणतेंही साधन नामाच्या तुलनेस येत नाहीं.

समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान । करितां समान नये नामा ॥
म्हणऊनि कोणी न करावा आळस । म्हणा रात्रंदिवस रामराम॥
सकळही शास्त्रें पठण करितां वेद । सरी नये गोविंदनामें एकें॥
सकळही तीर्थें प्रयाग काशी । करितां नामासी तुळेति ना ॥
करवतीं कमरीं देहासी दंडण । करितां समान नये नामा ॥
तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेंचि सार विठोबाचें ॥

## २८१. नामस्मरणानें अलभ्यलाभाची प्राप्ति.

न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥
न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥
न बोलों तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥
न भेटे तें भेटों येईल आपण । करितां चिंतन विठोबाचें ॥
अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचे ॥
तुका म्हणे आसक्त जीव सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥

## २८२. नामस्मरण हा निर्वाणींचा बाण असल्यानें वाचा व्यर्थ वेंचूं नये.

हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्धि सेवा देवाची हे ॥
आधंडीं विठ्ठल गाईजे एकांतीं । अलभ्य ते येती लाभ घरा ॥
आणिकां अंतरीं न द्यावी वसति । करावी हे शांति वसनेची ॥
तुका म्हणे बाण हाचि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेंचूं नये॥

---

१ बरोबरी. २ बरोबरीला येत नाहींत. ३ एक प्रकारचें शस्त्र. ४ निवांत, उगीच.

### २८३. उठाउठी सारासारविचार करा.

सारासार विचार करा उठाउठी[1] । नाम धरा कंठीं विठोबाचें ॥
तयाच्या चिंतनें निरसेल संकट । तराल दुर्घट भवसिंधु ॥
जन्मोनियां कुळीं वाचे स्मरे राम । धरी हाचि नेम अहर्निशीं ॥
तुका म्हणे कोटि कुळें तीं पुनीतें[2] । भावें गातां गीत विठोबाचें ॥

### २८४. भवरोग जाण्याचें साधन.

ब्रह्मरस घेई काढा । जेणें पीडा वारेल ॥
पथ्य नाम विठोबाचें । आणीक वाचे न सेवीं ॥
भवरोगा[3] ऐसें जाय । आणिक काय क्षुल्लकें ॥
तुका म्हणे नव्हे बाधा । आणिक कदा भूतांची ॥

### २८५. देह भोगाचे अधीन असल्यानें नामस्मरणावांचून सुख नाहीं.

देह तंव असे भोगाचे अधीन । याचें सुखसीण क्षणभंगुर ॥
अविनाश जोडी देवापायीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥
क्षणभंगुर हा येथील पसारा । आलिया आकारा अवघें नासे ॥
तुका म्हणे येथें सकळ विश्रांति । आठवावा चित्तीं नारायण ॥

### २८६. निश्चळ नामस्मरणानें अविनाश सुखप्राप्ति.

न करीं तळमळ राहें रे निश्चळ । आहे हा कृपाळ स्वामी माझा ॥
अविनाश सुख देईल निर्वाणीं[4] । चुकतील खाणी[5] चौऱ्यांशीच्या ॥
आणिकीयां जीवां होईल उद्धार । तेही उपकार घडती कोटि ॥

---

१ त्वरित. २ पवित्र. ३ संसाररूपी रोग. ४ शेवटीं. ५ जन्म, योनि.

आहिक्य[1] परत्रीं[2] होसील सरता[3] । वाचे उच्चारितां राम राम ॥
तुका म्हणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥

२८७. विठ्ठल हाच आमचा आहार झाला आहे.

नाम गोड नाम गोड । पुरे कोडें[4] सकळही ॥
रसना[5] येरां रसां विटे । घेतां घोटें[6] अधिक हें ॥
आणिकां रसें मरण गांठीं । येणें तुटी[7] संसार ॥
तुका म्हणे आहार झाला । हा विठ्ठल आम्हांसी ॥

२८८. तूं भीत असशील तर आम्ही तुजजवळ कांहीं मागत नाहीं.

आम्ही मागों ऐसें नाहीं तुजपाशीं । जरी तूं भितोसि पांडुरंगा ॥
पाहे विचारूनि आहे तुज ठावें । आम्ही धालों नांवें तुझ्या एका ॥
ऋद्धि सिद्धि तुझें मुख्य भांडवल । हें तों आम्हां फोल भक्तीपुढें ॥
तुका म्हणे जाऊं वैकुंठा चालत । बैसोनि निवांत सुख भोगूं ॥

२८९. तुझ्या नामाचें सुख तुला माहीत असणें शक्य नाहीं.

कुमुदिनी[8] काय जाणे तो परिमळें[9] । भ्रमर[10] सकळ भोगितसे ॥
तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आम्हीच तें प्रेम सुख जाणों ॥
माते तृण बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥
तुका म्हणे मुक्ताफळ[11] शिंपीपोटीं । नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥

---

१ इहलोकीं. २ परलोकांत. ३ मान्य. ४ इच्छा. ५ जिव्हा. ६ गिळणें. ७ वियोग. ८ कमळ. ९ सुवास. १० भुंगा. ११ मोतीं.

# ८. कीर्तनाचें महत्त्व.

## २९०. कथेमध्यें देव उभा असतो.

कथा देवाचें हें ध्यान । कथा साधन मंडण[1] ।
कथेऐसें पुण्य । आणिक नाहीं सर्वथा ॥
ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥
मंत्रस्वरूप जना । उच्चारितां वाचे मना ।
म्हणतां नारायणा । क्षणें जळती महादोष ॥
भावें करितां कीर्तन । तरे तारी आणीक जन ।
भेटे नारायण । संदेह नाहीं म्हणे तुका ॥

## २९१. ज्याचा हरिकथेवर विश्वास नाहीं त्याचे कान उंदराचें बीळच होत.

हरिकथे नाहीं । विश्वास ज्याचे ठायीं ॥
त्याची वाणी अमंगळ । कान उंदराचें बीळ ॥
सांडुनी हा रस । करिती आणीक सायास ॥
तुका म्हणे पिसीं[2] । वायां गेलीं किती ऐसीं ॥

## २९२. ज्याला आपलें स्वहित करणें असेल तोच कीर्तनास जाईल.

मुंगीचिया घरा कोण जाय मूळ[3] । देखोनियां गूळ धांव घाली ॥
याचकाविण काय खोळंबला दाता । तोचि धांवे हिता आपुलिया ॥

---

१ भूषण, शोभा. २ वेडीं. ३ बोलावणें, आमंत्रण.

उदक अन्न काय म्हणे मज खावें । भुकेला तो जाय चोजवीत ॥
व्याधीपिडिला धांवे वैद्याचिया घरा। दुःखाच्या परिहारा आपुलिया
तुका म्हणे जया आपुलें स्वहित। करणें तोचि प्रीत धरी कथे ॥

२९३. देहांतल्या बळावरच कथेची सामग्री अवलंबून आहे.

कथेची सामग्री । देहअवसानावरी ॥
नको जाऊं देऊं भंगा । गात्रें माझीं पांडुरंगा ॥
आयुष्य करी उणें । परि मज आवडो कीर्तन ॥
तुका म्हणे हानी । या वेगळी मना नाणी ॥

२९४. हरिकथा ही ऊर्ध्ववाहिनी गंगा आहे.

प्रेमअमृताची धार । वाहे देवा ही समोर ॥
उर्ध्ववाहिनी हरिकथा । मुगुटमणि सकळां तीर्थां ॥
शिवाचें जीवन । जाळी महादोष कीर्तन ॥
तुका म्हणे हरी । इची स्तुति वाणी थोरी ॥

२९५. कथा म्हणजे देव, भक्त, आणि नाम यांचा त्रिवेणी-संगम होय.

कथा त्रिवेणी संगम । देव भक्त आणि नाम ।
तीर्थीचें उत्तम । चरणरज वंदितां ॥
जळती दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारी नर ।
गाती ऐकती सादर । जे पवित्र हरिकथा ॥
तीर्थें तया ठाया । येती पुनीत व्हावया ।
पर्वकाळ पाया । तळीं वसे वैष्णवां ॥

---

१ शोध करणें. २ निरसन. ३ बळ. ४ अवयव. ५ पवित्र. ६ पुण्यवेळ.

अनुपम्य हा महिमा । नाहीं द्यावया उपमा ।
तुका म्हणे ब्रह्मा । नेणें वर्णू या सुखा ॥

२९६. माझी कथा करवा असें मी कोणांस म्हणेन तर माझी जिव्हा झडूं दे.

द्रव्य घेऊनियां कथा जरी करीं । तरी भंगो हरी देह माझा ॥
माझी कथा करा ऐसें म्हणे कोणा । तरी नारायणा जिव्हा झडो ॥
साह्य[1] तूं झालासी काय उणें तूपें । आणीक भूतांपें[2] काय मागों ॥
तुका म्हणे सर्व सिद्धि तुझे पायीं । तूं माझा गोसांवी पांडुरंगा ॥

२९७. निःस्पृहत्व हाच कीर्तनकाराचा मुख्य गुण.

जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥
बुका लावूं नये भाळा[3] । माळ घालूं नये गळां ॥
तट्टा[4]वृषभासी दाणा[5] । तृण मागों नये जाणा ॥
तुका म्हणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥

२९८. गायनाच्या रंगांत अद्भुतशक्तीचा अंगांत संचार होतो.

गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगीं ॥
हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडित सेवा ॥
अंगीं प्रेमाचें भरतें । नेघे उतार चढतें ॥
तुका म्हणे वाणी । परम अमृताची खाणी ॥

२९९. ब्रह्मसुख मिळण्याचें सोपें वर्म.

सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा ॥
समाधीचें सुख सांडा ओंवाळून । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ॥

---

१ तुझ्याजवळ. २ मालक. ३ कपाळ. ४ घोडा व बैल. ५ दाणा.

पुढती घडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥
उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या॥
तुका म्हणे मन पावोनि विश्रांति । त्रिविध[1] नासती ताप क्षणें ॥

### ३००. कथेचे ठिकाणीं जाऊं नका असें यम आपल्या दूतांस सांगतो.

यम सांगे दूतां । तुम्हां नाहीं तेथें सत्ता ।
जेथें होय कथा । सदा घोष नामाचा ॥
नका जाऊं तया गांवां । नामधारकाच्या शिवा[2] ।
सुदर्शन यावा[3] । घरटी[4] फिरे भोंवतीं ॥
चक्र गदा घेउनी हरि । उभा असे त्यांचे द्वारीं ।
लक्ष्मी कामारी[5] । रिद्धिसिद्धीसहित ॥
ते हे बळिया शिरोमणी । हरिभक्त ये मेदिनी[6] ।
तुका म्हणे कानीं । यम सांगे दूतांचे ॥

### ३०१. काळास देवापाशीं बळ करितां येत नाहीं.

पाठीं पोटीं देव । कैंचा हरिदासा भेवं[7] ॥
करा आनंदें कीर्तन । नका आशंकित मन ॥
येथें कोठें काळ । करील देवापाशीं बळ ॥
तुका म्हणे धनी[8] । सपुरता काय वाणी ॥

### ३०२. कीर्तनामुळें प्राप्त होणारी अत्यंत निर्भय स्थिति.

लावुनि काहोंळा । सुखें करितों सोहळा ॥

---

१ आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक हीं तीन प्रकारचीं दुःखें. २ सीमा. ३ आगमन. ४ फेरी. ५ नोकर. ६ पृथ्वी. ७ भीति. ८ मालक. ९ बलवान्. १० झांज.

साद्यांत गेलों जना । भय नाहीं सत्य जाणा ॥
गातां नाचतां विनोदें । टाळ घागरियांच्या छंदें ॥
तुका म्हणे भेव । नाहीं पुढें येतो देव ॥

३०३. कीर्तन हीच समाधि.

जप तप ध्यान नलगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजी उभा ॥
राहे माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥
कीर्तनीं समाधि, साधन तें मुद्रा । राहतील थारां धरोनियां ॥
तुका म्हणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । वोळगती चारी ऋद्धिसिद्धी ॥

---

१ हांका मारण. २ चित्ताला विवक्षित ठिकाणां ठवणें. ३ आश्रय.

## ९. भक्त्युपदेश.

### ३०४. सर्व ठिकाणीं देव पाहणें हीच भक्ति.

कवणाचें कारण न लगेचि कांहीं । सर्वां सर्वां ठायीं तूं मज एक ॥
कायावाचामन ठेविलें तुझ्या पायीं । आतां उरलें कांहीं न दिसे देवा ॥
कवणा पाषाणासी धरूनियां भाव । कवणावरी पाव ठेवूं आतां ॥
म्हणऊनि निश्चित राहिलों मनीं । तूंचि सर्वां खाणीं[1] देखोनियां ॥
जळें जळ काय धोवियेलें एक । कवण तें पातक हरलें तेथें ॥
पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥
पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्यें[2] ते कवण अपसव्य[3] ॥
तुका म्हणे जीतें[4] पिंड तुझ्या हातीं । देऊनि निश्चिंती मानियेली ॥

### ३०५. भक्तिपंथ हाच सोपा मार्ग होय.

अवघ्या वाटा जाल्या[5] क्षीण । कळीं[6] न घडे साधन ।
उचित विधिविधान । न कळे न घडे सर्वथा ॥
भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नागवे या पापा ।
येणें जाणें खेपा । येणेंचि एक खंडती ॥
उभारोनि बाहे । विठो पालवीत आहे ।
दासां मीच साहे । मुखें बोले आपुल्या ॥
भाविक विश्वासी । पार उतरिलें त्यांसीं ।
तुका म्हणे नासी । कुतर्क्यांचे कपाळीं ॥

---

१ प्राणी. २ उजवें. ३ डावें. ४ जिवंत. ५ शेषमात्र राहिल्या. ६ कलियुगांत. ७ स्वाधीन न होणें. ८ खुणेनें बोलावणें. ९ नाश.

३०६. देव सगुणही नाहीं, व निर्गुणही नाहीं.

नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धराया ॥
जेथें जावें तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥
नाहीं आकार विकार । चराचर भरलेंसें ॥
नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ॥
तुका म्हणे भावाविण । त्याचें मन वोळेना ॥

३०७. तुझ्या मधुरस्वरावांचून देव खोळंबला नाहीं; त्यास आवडीची भक्ति पाहिजे.

नये जरी तुज मधुर उत्तर । दिधला सुस्वर नाहीं देवें ॥
नाहीं तयाविण भुकेला विठ्ठल । येइल तैसा बोल रामकृष्ण ॥
देवापाशीं मागे आवडीची भक्ति । विश्वासेंशीं प्रीति भावबळें ॥
तुका म्हणे मना सांगतों विचार । धरावा निर्धार दिसेंदिसें[२] ॥

३०८. भावावांचून देव भिळणें शक्य नाहीं.

कासिया पाषाण पूजितसा पितळ । अष्टधातु खळ[३] भावेंविण ॥
भावाचि कारण भावचि कारण । मोक्षाचें साधन बोलियेलें ॥
काय करिल जपमाळा कंठमाळा । करिशी वेळोवेळां विषयजप ॥
काय करिशील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥
काय करिशील कुशल गायन । अंतरीं मळीण दुर्बुद्धि ते ॥
तुका म्हणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होशी ॥

३०९. देव भोळ्या भावाचा भुकेला आहे.

जीवेंसाटीं यत्नभाव । त्याची नाव बळकट ॥
पैलतीरा जातां कांहीं । संदेह नाहीं भवनदी ॥

---

१ कार्य. २ दिवसेंदिवस. ३ दुष्ट.

विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥
तुका म्हणे भोळियांचा । देव साचा अंकित ॥

३१०. अंतरींच्या त्यागावांचून गोष्टी बोलणें व्यर्थ आहे.

भावनेच्या मुळें अंतरला देव । शिरला संदेह भय पोटीं ॥
पोटीं होतें मागें जीव द्यावा ऐसें । बोलिल्यासारिसें न करवे ॥
न करवे त्याग जीवाचा या नास । नारायण त्यास अंतरला ॥
अंतरला बहु बोलतां वाउगें । अंतरींच्या त्यागेंविण गोष्टी ॥
गोष्टी सकळांच्या आइकिल्या देवें । कोण कोण्याभावें रडतीं तीं ॥
तीं गेलीं घरास आपल्या सकळ । गोधनें गोपाळ लोक मायें ॥
मायबापांची तो ऐसी जाली गति । तुका म्हणे अंतीं कळों आलें ॥

३११. अग्नि पाहून सतीस आनंदाचे रोमांच उठतात.

आगी देखोनि सती । अंगीं रोमांच उठती ॥
हा तो नव्हे उपदेश । सुख अंतरीं उल्हास ॥
वित्तगोताकडे । चित्त न घाली न रडे ॥
आठवूनि एका । उडी घाली म्हणे तुका ॥

३१२. संसारास अग्नि लावून पुनः मागें परतून पाहूं नये.

परपुरुषाचें सुख भोगे जरी । उतरोनी करीं घ्यावें सीसें ॥
संवसारा आगी आपुलेनि हातें । लावूनी मागुतें पाहूं नये ॥
तुका म्हणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपावरी ॥

३१३. ईश्वरावरील प्रेमास कारंजाची उपमा योग्य आहे.

भोजन पां शांतीचें । उंच नीच उसाळी ॥
जैशी कारंज्याची कळा । तो जिव्हाळा स्वहिताचा ॥

१ स्वाधीन. २ सारखें. ३ आई. ४ शीर. ५ फुलपांखरूं.

कल्पना ते देवाविण । न करी भिन्न इतरीं ॥
तुका म्हणे पावे मूर्ती । ते निश्चिंती मापली ॥

३१४. नादावर लुब्ध झालेल्या मृगाप्रमाणें मी हरिगुणांवर लुब्ध व्हावें.

पुत्राची वारता[1] । शुभ ऐके जेवीं माता ॥
तैसें राहो माझें मन । गातां ऐकतां हरिगुण ॥
नादें लुब्ध जाला मृग । देह विसरला अंग ॥
तुका म्हणे पाहे । कासवीचें पिलें माये ॥

३१५. जळांत राहिलेल्या पद्मपत्राप्रमाणें अलिप्तता येईपर्यंत इतर सर्व गोष्टी व्यर्थ होत.

जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥
मग मी व्यवहारीं असेन वर्तत । जेवीं जळाआंत पद्मपत्र[2] ॥
ऐकोनि नाइकें निंदास्तुति कानीं । जैसा का उन्मनीं[3] योगिराज ॥
देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टि । स्वप्नींचिया सृष्टि चेइल्या[4] जेवीं ॥
तुका म्हणे ऐसें जालियावांचून । करणें तें तें सीण वाटतसे ॥

---

१ बातमी. २ कमळाचें पान. ३ मनरहित अवस्था. ४ जागा झालेल्यास.

# १०. जातिविचार.

### ३१६. विष्णुदासांस जातिधर्म नाहीं.

पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती ॥
कर्मधर्म त्यांचे जाला नारायण । त्यांचेनी पावन तिन्ही लोक ॥
वर्णअभिमानें कोण जाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥
अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयाचीं पुराणें भाटें[1] जालीं ॥
वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास ॥
कबीर मोमीन लतिफ मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥
कान्होपात्रा खोदु पिंजारी तो दादु । भजनीं अभेदु हरिचे पायीं ॥
चोखामेळा वंका जातीचा महार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥
नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरीराव तियेसवें ॥
मैराळ जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें काय सांगों ॥
यातायातीधर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥
तुका म्हणे तुम्ही विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥

### ३१७. ज्याचें मुखीं नाम तोच धन्य.

कस्तुरीचें रूप अति हीनवर[2] । माजी असे सार मोल तया ॥
आणीकही तैसीं चंदनाचीं झाडें । परिमळें वाढे मोल तया ॥
काय रूपें असे परीस चांगला । धातु केली मोला वाढ तेणें ॥
फिरंगी[3] आटितां नये बारा रुके[4] । गुणें मोलें विके सहस्रवरी ॥
तुका म्हणे नाहीं जातीसवें काम । ज्याचें मुखीं नाम तोचि धन्य ॥

---

१ वर्णन करणारीं. २ वाईट. ३ पोलादाचें शस्त्र. ४ पै.

### ३१८. संताचें मूळ शोधण्याचें कारण नाहीं.

गंधर्व अग्नि सोम भोगिती कुमारी । कोठें चराचरीं त्याग केला॥
गायत्री[1] स्वमुखें भक्षीतसे मळ । मिळाल्या वोहळ गंगाओघ ॥
कागाचिये विष्ठे जन्म पिंपळासी । पांडवकुळासी पाहतां दोष ॥
शकुंतला सूत कर्ण शृंगी व्यास । यांच्या नामें नाश पातकांसी ॥
गणिका अजामेळ कुब्जा तो विदुर । पाहा पां विचार पिंगळेचा॥
वाल्हा[3] विश्वामित्र वसिष्ठ नारद । यांचें पूर्व शुद्ध काय आहे ॥
न व्हावीं तीं झालीं कर्मे नरनारी । अनुतापें[4] हरी स्मरतां मुक्त ॥
तुका म्हणे पूर्व नाठवी श्रीहरि । मूळ जो उच्चारी नर्क त्यासी ॥

### ३१९. ज्यास हरिनामकीर्तन आवडत नाहीं तो ब्राह्मणच नव्हे.

ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि । पहा श्रुतीमधीं विचारूनि ॥
जयासी नावडे हरिनामकीर्तन । आणिक नर्तन वैष्णवांचें ॥
सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेशीं वेव्हार अंत्यजाचा ॥
तुका म्हणे येथें मानी ऑनसारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ठ होय ॥

### ३२०. अंत्यज असूनही जो रामनाम उच्चारितो तोच ब्राह्मण.

ब्राह्मण तो याती अंत्यज असतां । मानावा तत्वतां निश्चयेंसी ॥
रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥
शांति क्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥
तुका म्हणे गेल्या षड्उर्मी अंग । सांडूनियां मग ब्राह्मण तो ॥

### ३२१. ब्राह्मण कर्मभ्रष्ट झाला तरी तो श्रेष्ठच समजला पाहिजे.

दुधाळ गाढवी जरी जाली पाहे । पावेल ते काय धेनुसरी[6] ॥

---

१ गाय. ५ ओहोळ. ६ वाल्मीकऋषि. ४ पश्चात्ताप. ५ विरुद्ध, उलट. ६ बरोबरी.

कागांचिया गळां पुष्पांचिया माळा। हंसाची तो कळा काय जाणे॥
मर्कटें अंघोळी लावियेले टिळे। ब्राह्मणाचे लीळे वर्तू नेणे ॥
जरी तो ब्राह्मण झाला कर्मभ्रष्ट। तुका म्हणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥

३२२. मन उन्मन होईपर्यंत इतर गोष्टींची सोय पाळावी लागते.

वेदविहित तुम्ही आइका हो कर्में। बोलतों तीं वर्में संतांपुढें ॥
चारी वर्ण झाले एकाचिये अंगीं। पापपुण्य भागीं विभागिलें ॥
प्रथम पाउलीं पावविला पंथ। आदि मध्य अंत भेद नाहीं ॥
आंबे बोरी वड बाभुळा चंदन। गुणागुणीं भिन्न अग्नि एक ॥
तुका म्हणे मन उन्मन जों होय। तोंवरि हे सोय विधि पाळी ॥

---

१ कावळा.

# ११. विठ्ठलदर्शन.

३२३. देवाचें श्रीमुख न पाहिल्यास प्राण देहच सोडून जाईल असें वाटतें.

सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचें विटेवरी ॥
डोळियांची धणी पाहतां न पुरे । तयालागीं झुरे मन माझें ॥
प्राण रिघों पाहे कुंडी हे सांडूनी । श्रीमुख नयनीं न देखतां ॥
चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें । तुका म्हणे येणें गरुडध्वजें ॥

३२४. वारीबद्दलचें आर्त ज्याच्या मनांत आहे त्याची देव वाट पाहतो.

संपदा सोहळा नावडे मनाला । लागला टकळा पंढरीचा ॥
जावें पंढरीसी आवडी मनासी । कई एकादशी आषाढी ये ॥
तुका म्हणे ऐसें आर्त ज्याचे मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ॥

३२५. संतांनीं लाविलेलें निशाण पाहून मी नामाचा जयजयकार करितो.

कारणा कारण वारियेलें जेथें । जातों तेणें पंथें साद्दावित ॥
संतीं हें पैंल लाविलें निशाण । ते खूण पाहोन गर्जे नाम ॥
तुका म्हणे चला याचि वाटे । पांडुरंग भेटे भरंवशानें ॥

३२६. याच वाटेनें मागलि साधुसंत गेले आहेत.

मारगीं बहुत । याचि गेले साधुसंत ॥
नका जाऊं आडरानें । ऐसी गर्जतीं पुराणें ॥

---

१ शरीर. २ विष्णु. ३ संपत्ति. ४ छंद, घोष. ५ उत्कट इच्छा. ६ हांक मारून सांगणें. ७ पलीकडे.

चोखाळिल्या वाटा । न लगे पुसाव्या घोपटा ॥
झळकवी पताका । गरुडटके म्हणे तुका ॥

३२७. येथें रुका द्यावा लागत नाहीं, भाव द्यावा लागतो.

अनंताच्या ऐकों कीर्ति । ज्याच्या चित्तीं हरिनाम ॥
उल्लंघूनि गेले सिंधु । हा भवबंधु तोडोनियां ॥
हळुहळु तेचि वाहीं । चालों कांहीं अधिकारें ॥
खुंटूनियां गेले नावा । नाहीं हेवा खोळंबा ॥
नलगे मोल द्यावा रुका । भाव एका कारणें ॥
भीमातीरीं थडवा केला । उठा चला लवलाहें ॥
तुका म्हणे पाहतो वाट । उभा नीट पाउलीं ॥

३२८. हरिनामाच्या तारूवर तुका हमाल झाला आहे.

तारूं लागलें बंदरीं । चंद्रभागेचिये तिरीं ॥
लुटा लुटा संतजन । अमुप हें रासी धन ॥
झाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥
तुका जवळी हमाल । भार चालवी विठ्ठल ॥

३२९. तेथें दुःख देऊन सुख घ्यावें.

दुःखाचिये सांटीं तेथें मिळे सुख । अनाथांची भूक दैन्य जाय ॥
उदाराचा राणा पंढरीस आहे । उभारोनि बाहे पालवितो ॥
जाणतियाहुनि नेणत्याची गोडी । आलिंगी आवडी करूनियां ॥
शीण घेऊनिया प्रेम देतो साटी । न विचारी तुटी लाभा कांहीं ॥
तुका म्हणे असों अनाथ दुबळीं । आम्हांसी तो पाळी पांडुरंग ॥

---

१ शुद्ध करणें. २ रुळलेल्या. ३ गरुडाचा आकृति काढलले निशाण. ४ मार्ग. ५ पै. ६ लहान तळें. ७ तारूं. ८ बदली. ९ खुणेनें बोलावणें.

३३० भावाचें निर्गुणरूपच सगुणरूपानें विटेवर उभें आहे.

अंतरींची ज्योती प्रकाशली दीप्ति । मुळींची जे होती आच्छादिली ॥
तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न समाये । उपमेशीं काये देऊं सुखा ॥
भावाचे मथिलें निर्गुण संचलें । तें हें उभें केलें विटेवरी ॥
तुका म्हणे आम्हां ब्रह्मांड पंढरी । प्रेमाची जे थोरी सांठवण ॥

३३१ ज्याच्या पोटांत अनंत ब्रह्मांडें आहेत तो हा नंदाचे घरीं बालक झाला आहे.

अनंत ब्रह्मांडें उदरीं । हरि हा बाळक नंदाघरीं ॥
नवल केव्हडें केव्हडें । नकळे कान्होबाचें कोडें ॥
पृथ्वी जेणें तृप्त केली । त्यासी यशोदा भोजन घाली ॥
विश्वव्यापक कमळापति । त्यासी गौळणी कडिये घेती ॥
तुका म्हणे नटधारी । भोग भोगूनि ब्रह्मचारी ॥

३३२. पुंडलीकानें थारा दिलेल्या सर्वांचें हृदय आकर्षण करणाऱ्या चोरास आपण धरूं.

मैंदं[3] आला पंढरीस । हातीं घेऊनि प्रेमपाश ॥
पुढें नाडियेलें जग । नेतो लागों नेदी मोग ॥
उभारोनि बाहे । दृष्टादृष्टीं वेधीताहे ॥
वैकुंठाहुनि पेणें[6] । केलें पंढरीकारणें ॥
पुंडलीकें थारा[7] । देऊनि आणिलें या चोरा ॥
तुका म्हणे चला । तुम्हीं आम्हीं धरूं त्याला ॥

---

१ मावत नाहीं. २ गुह्य. ३ घातकी ढोंगी मनुष्य. ४ फसवणें. ५ पत्ता. ६ मुक्काम. ७ आश्रय.

## ३३३. पुंडलीका, तूं भक्तिबळानें मातला आहेस.

कां रे प्रेमें मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥
ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली वीट ॥
युगें झालीं अठ्ठावीस । अजुनि न म्हणसी बैस ॥
भाव देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥
तुका म्हणे पुंडलिका । तूंचि भक्त बळिया निका[1] ॥

## ३३४. आज अमरावती ओस पडून देवांचें दैवत रंगणांत उभें आहे.

आजी ओस अमरावती । काला पहावया येती ।
देव विसरती । देहभाव आपुला ॥
आनंद न समाये मेदिनी । चारा विसरल्या पाणी ।
तटस्थ त्या ध्यानीं । गाई झाल्या श्वापदें ॥
जें देवांचें दैवत । उभें असे या रंगांत ।
गोपाळांसहित । क्रीडा करी कान्होबा ॥
जया सुखाची शिरोणी[2] । तींच पाउलें मेदिनी ॥
तुका म्हणे मुनी । धुंडितांही न लाभती ॥

## ३३५. पंढरीच्या भुताच्या झपाट्यांत सांपडाल तर तुम्हांस परत येण्याची आशा नको.

पंढरीचें भूत मोठें । आल्या गेल्या झडपी[3] वाटे ॥
बहु खेचरींचें[4] रान । जातां वेडें होय मन ॥
तेथें जाऊं नका कोणी । गेले नाहीं आले परतोनि ॥
तुका पंढरीसी गेला । पुन्हां जन्मा नाहीं आला ॥

---

१ चांगला, खरोखर. २ आवड. ३ पछाडणें. ४ पिशाच.

३३६. वाळवंट सोडून वैकुंठाची कां इच्छा करतोस?

जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ॥
सांडोनियां वाळवंट । काय इच्छिसी वैकुंठ ॥
खांद्या पताकांचे भार । तुळसीमाला आणि अबीर ॥
साधुसंतांच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥

---

१ बुक्का. २ समुदाय.

## १२. सगुणविचार.

३३७. आम्हांस तुझ्या अरूपस्थितीची चाड नसून स्वरूपस्थितीची आहे.

इच्छिती तयांसी व्हावें जी अरूप। आम्हांसी स्वरूपस्थिती [1]चाड॥
आतां नव्हे माझा भाव अनारिसा। पाउलांनीं इच्छा गोंवियेली॥
लेकरांसी कोठें जाणत्याची परी। करूं येते दुरी धरावया॥
लागली न सुटे नामाची आवडी। माझी भावजोडी भंगूं नका॥
घेसलि आढेवेढे मुक्तीच्या अभिलासें। चाळवी जा पिसे ब्रह्मज्ञानी॥
तुका म्हणे माझा कोठें भक्तिरस। पाडावया ओस चाळविसी॥

३३८. निराकार देवास आम्हीं आकार धरण्यास लावूं.

मोक्षपद तुच्छ केलें या कारणें। आम्हां जन्म घेणें युगायुगीं॥
विटेपेसें सुख नव्हे भक्तिरस। पुढती पुढती आस सेवावें हें॥
देवा हातीं रूप धराविला आकार। नेदूं निराकार होऊं त्यासी॥
तुका म्हणे चित्त निवांत राहिलें। ध्याईं तीं पाऊलें विटेवरि॥

३३९. भक्ताच्या भीतीनें देवास आकार घ्यावा लागतो.

नाहीं काष्ठाचा गुमान। गोवी भ्रमरा सुमन॥
प्रेम प्रीतीचें बांधलें। तें न सुटे कांहीं केलें॥
पदरीं घाली पिळा। बाप निर्बळ साटी बाळा॥
तुका म्हणे भावें। भेणें देवें आकारावें॥

---

१ इच्छा. २ वेगळा, भिन्न. ३ पुनः पुनः. ४ फिकीर, पर्वा.

३४०. "एका एक भेटे । कोण सुख ते काळीं ?"

जळो माझी ऐसी बुद्धी । मज घाली तुजमधीं ।
आवडी हे विधि -। निषेधींच चांगली ॥
तूं स्वामी मी सेवक । उंच पद निंच एक ।
ऐसें करावें कौतुक । नको करूं खंडणा ॥
जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा ।
भोक्ता तो निराळा । तेणें गोडी निवडिली ॥
हिरा शोभला कोंदणें । अळंकारीं मिरवे सोनें ।
एक असतां तेणें । काय दुजें जाणावें ॥
उष्णें छाये सुख वाटे । बाळें माते पान्हा फुटे ।
एका एक भेटे । कोण सुख ते काळीं ॥
तुका म्हणे हित । हेंचि मानी माझें चित्त ।
नव्हे आतां मुक्त । ऐसा झाला भरंवसा ॥

३४१. जो देव झालों म्हणेल तो पतनास जाईल.

एक म्हणती आम्ही देवाचि पैं झालों ।
ऐसें नका बोलों पडाल पतनीं ॥
एक म्हणती आम्ही देवाचीं पैं रूपें ।
तुमाचिया बापें न चुके जन्म ॥
देवें उचलिली स्वमुखें मेदिनी[1] ।
तुमचेनी गोणी नुचलवे ॥
देवें मारियेले दैत्य दानव मोठे ।
तुमचेनि न तुटे तृणमात्र ॥
राया विठोबाचें पद जो अभिलाषी ।
पातकाची राशी तुका म्हणे ॥

---

१ पृथ्वी.

## ३४२. जो अहं ब्रह्म म्हणतो त्यास भक्तीचें वर्म कळत नाहीं.

विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे, मरो हें बोलतां ॥
मज न साहावे कानीं । विष उत्तर लागे मनीं ॥
हरिकथेतें धिक्कारी । शत्रु माझा तोचि वैरी ॥
सुना काळतोंडा । जो या देवा म्हणे धोंडा ॥
अहं म्हणे ब्रह्म । नेणे भक्तीचें तें वर्म ॥
तुका म्हणे क्षण । नको तयाचें दर्शन ॥

## ३४३. जो देव देखिला म्हणतो तो लटक्यांचा राजा.

तोचि लटिक्यामाजी भला । म्हणे देव म्यां देखिला ॥
ऐशियाच्या उपदेशें । भवबंधन कैसें नासे ॥
बुडवी आपणासरिसें । अभिमानें आणिकांस ॥
आणिक नाहीं जोडा । देव म्हणवितां या मूढा ॥
आणिकाचें न मनी साचें । तुका म्हणे या श्रेष्ठाचें ॥

## ३४४. अद्वैतांत माझें समाधान नाहीं.

अद्वैतीं तों नाहीं माझें समाधान । गोड हे चरणसेवा तुझी ॥
करूनि उचित[१] देईं हेंचि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ॥
देवभक्तपण सुखाचा सोहळा । ठेवूनि निराळा दावीं मज ॥
तुका म्हणे आहे तुझें हें सकळ । कोणे एके काळें देईं मज ॥

## ३४५. मला आत्मस्थितिभाव नको; तूं देव मी भक्त असें कर.

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥
दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवूं दे चरणांवरी माथा ॥
पाहीन श्रीमुख देईन आलिंगन । जीवें निंबलोण[२] उतरीन ॥

१ योग्य. २ दृष्ट लागूं नये म्हणून अंगावरून उतरून टाकणें.

पुसतां सांगेन हितगुज मात । बैसोनि एकांत सुखगोष्टी ॥
तुका म्हणे यासी न लावी उशीर । माझें अभ्यंतर जाणोनियां ॥

### ३४६. सायुज्यमुक्तीमध्यें देवाभक्तांचें सौख्य नाहीं.

आत्मस्थिति मज नको हा विचार । देईं निरंतर चरणसेवा ॥
जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा । हेचि गोडी आम्हां देईं देवा॥
काय सायुज्यतामुक्तिसवें चाड । देवभक्तकोंड तेथें नाहीं ॥
काय तें निर्गुण पाहों कैशापरी । वर्णूं तुझी हरि कीर्ति कैशी ॥
गोड चरणसेवा देवभक्तपणें । मज देवा झणें दुराविसी ॥
जाणिवेपासूनि सोडवी सत्वर । देईं निरंतर चरणसेवा ॥
तुका म्हणे गोडा गोड नलगे प्रीति । सेवेविण चित्तीं सार नाहीं ॥

### ३४७. सदा नामघोष केल्यानें आम्हीं देहींच विदेहावस्था भोगतों.

सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥
सर्व सुख ल्यालों सर्व अलंकार । आनंदें निर्भर डुलतसों ॥
असो ऐसा कोठें आठवहि नाहीं । देहींच विदेहीं भोगूं दशा ॥
तुका म्हणे आम्हीं जालों अग्निरूप । लागों नेदूं पुण्यपाप अंगा ॥

### ३४८. वैकुंठींच्या वासापेक्षां कीर्तनांतील रसच श्रेष्ठ आहे.

देवा ऐकें हे विनंति । मज नको रे ही मुक्ति ।
तया इच्छा गति । हें सुख आगळें ॥
या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी ।
ऋद्धिसिद्धि द्वारीं । कर जोडूनि तिष्ठती ॥
नको वैकुंठींचा वास । असे तया सुखा नाश ।
अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा ॥

---

१ कौतुक. २ अधिक.

तुझ्या नामाचा महिमा। तुज न कळे मेघश्यामा।
तुका म्हणे आम्हां। जन्म गोड यासाठीं ॥

३४९. मला मुक्तीचें कारण नाहीं, केवळ संतसंग पाहिजे.

हेंचि दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा ॥
गुण गाईन आवडी। हेचि माझी सर्व जोडी ॥
नलगे मुक्ति आणि संपदा। संतसंग देईं सदा ॥
तुका म्हणे गर्भवासीं। सुखें घालावें आम्हांसी ॥

३५०. जन्मोजन्मीं वारकरी होण्याची इच्छा.

सुखें घेऊं जन्मांतरें। एक बरें इहलोकीं ॥
पंढरीचे वारकरी। होतां थोरी जोडी हे ॥
हें तों आलें अनुभवा। पाहावें जीवावरूनि ॥
तुका म्हणे केला त्याग। सर्वसंग म्हणवुनि ॥

३५१. वृक्षाचें पानही ईश्वराच्या सत्तेवांचून हालत नाहीं.

चाले हें शरीर कोणाचिये सत्ते। कोण बोलवितें हरीविण ॥
देखवी ऐकवी एक नारायण। तयाचें भजन चुको नका ॥
मानसाची देव चालवी अहंता। मीचि एक कर्ता म्हणूनियां ॥
वृक्षाचेंहि पान हाले ज्याची सत्ता। राहिली अहंता मग कोठें ॥
तुका म्हणे विठो भरला सबाह्य। उणें काय आहे चराचरीं ॥

३५२. आपण देवावर भार टाकून अयाचितवृत्तीनें रहावें.

देवावरी भार। वृत्ति अयाचित[1] सार ॥
देह देवाचे सांभाळी। सार योजे यथाकाळीं ॥

---

१ याचना न करतां मिळेल तसें.

विश्वासी निर्धार । विस्तारला विश्वंभर ॥
तुका म्हणे व्हावें । बळ एकचि जाणावें ॥

३५३. ईश्वर बुद्धीचा जनिता व विश्वाचा व्यापक असल्यानें त्यास काय एक करितां येणार नाहीं?

नये पुसों आज्ञा केली एकसरें । आम्हांसी दुसरें आतां नाहीं ॥
ज्याचा तो बळिवंत सर्व निवारिता[1] ।आम्हां काय चिंता करणें लागे॥
बुद्धीचा जनिता विश्वाचा व्यापक । काय नाहीं एक अंगीं तया॥
तुका म्हणे मज होईल वारता । तरी काय सत्ता नाहीं हातीं ॥

३५४. बाहुलीं मनुष्यें केलीं.

कासया जी ऐसा माझे माथां ठेवा । भार तुम्हीं देवा संतजन ॥
विचित्र विंदानीं[2] नाना कळा खेळे । नाचवी पुतळे नारायण ॥
काय वानरांची अंगींची ते शक्ती। उदका तरती वरी शिळा ॥
तुका म्हणे करी निमित्याचि आड । चेष्टावूनि जड दावी पुढें ॥

३५५. कुत्र्याप्रमाणें दारोदार कां फिरतोस? देवाजवळ काय कमी आहे?

काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं सुनें[3] ॥
करी अक्षरांची आटी[4]। एके कवडीच साठीं ॥
निंदी कोणा स्तवी। चिंतातुर सदा जीवीं ॥
तुका म्हणे भांड । जळो जळो त्याचें तोंड ॥

३५६. जें मागणें तें देवास माग.

मागणें तें मागों देवा । करूं भक्ति त्याची सेवा ॥
काय उणें तयापाशीं । ऋद्धि सिद्धि ज्याच्या दासी ॥
कायावाचामन । करूं देवा हें अर्पण ॥
तुका म्हणे विश्वंभर । ज्याच्यानें हें चराचर ॥

---

१ दुःख निवारण करणारा. २ कौशल्य. ३ कुत्रें. ४ श्रम.

३५७. आपल्या कृतीप्रमाणें देव आपणांस फळ देतो.

पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें। आपुलाल्या दैवें पिके भूमि ॥
बीज तेंचि फळ येईल शेवटीं। लाभ हानि तुटी ज्याची तया ॥
दीपाचिये अंगीं नाहीं दुजा भाव। धनी चोर साव सारिखेचि ॥
काउळ्या ढोपरं[2] कंकर[3] तित्तिरा[4]। राजहंसा चारा मुक्ताफळें ॥
तुका म्हणे येथें आवडी कारण। पिकला नारायण जयां तैसा ॥

३५८. देव ज्या स्थितींत आपणांस ठेवील त्या स्थितींत सुख मानावें.

आलें देवाचिया मना। तेथें कोणाचें चालेना ॥
हरिश्चंद्र ताराराणी। वाहे डोंबाघरीं पाणी ॥
पांडवांचा साहाकारी[5]। राज्यावरुनि केलें दुरी ॥
तुका म्हणे उगेंचि राहा। होईल तें सहज पहा ॥

३५९. सर्प व विंचू नारायण खरे, पण त्यांस लांबूनच नमस्कार करावा.

जन देव तरी पायांचि पडावें। त्याचिया स्वभावें चाड नाहीं[1] ॥
अग्नीचें सौजन्य शीतनिवारण। पालवीं[6] बांधोन नेतां नये ॥
तुका म्हणे विंचू सर्प नारायण। वंदावे दुरोन शिवों नये ॥

३६०. हिरा व गार दोन्ही पृथ्वीपासूनच निघत असलीं तरी त्यांस सारखेंच मानतां येत नाहीं.

दह्याचिये अंगीं निघे ताक लोणी। एका मोलें दोन्हीं मागों नये ॥
आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें। दोहींशीं समान पाहों नये ॥
पृथ्वीचिया पोटीं हिरा गारगोटी। दोहोंसी संसाटी[7] करूं नये ॥
तुका म्हणे तैसे संत आणि जन। दोहींसी समान भजूं नये ॥

---

१ सज्जन. २ जनावरांचें ढोपर. ३ खडे. ४ एका पक्ष्याचें नांव. ५ मदत करणारा. ६ पदरांत. ७ अदलाबदल.

# १३. देवाचें भक्तांविषयीं प्रेम.

## ३६१. ज्याची खरी सेवा त्यास आपल्या स्वामीस भिण्याचें कारण नाहीं.

ज्याची खरी सेवा । त्याच्या भय काय जीवा ॥
करितां स्वामीसवें वाद । अधिक अधिक आनंद ॥
असावा तो धर्म । मग साह्यों जातें वर्म ॥
वदे वाग्देवी । तुका, विठ्ठल गौरवी ॥

## ३६२. आम्हांपाशीं ज्या ज्या शक्ती असतील त्या आम्हीं देवास समर्पू.

ज्या ज्या आम्हापाशीं होतील ज्या शक्ति। तेणें हा श्रीपति अलंकारूं॥
अवघा पायापाशीं दिला जीव भाव । जन्ममरण ठांव[1] पुसियेला ॥
ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकविलें ॥
तुका म्हणे येथें उरला विठ्ठल । खाये बोले बोल गाय नाचे ॥

## ३६३. विश्वंभराचें ध्यान केल्यास त्यास काय करितां येणार नाहीं?

कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसितो जनासी एकला तो ॥
बाळा दूध कोण करितें उत्पत्ति । वाढवी श्रीपती सवें[2] दोन्ही ॥
फुटतां तरुवर उष्णकाळमासीं । जीवनें[3] तयांसी कोण घाली ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनि ॥
तुका म्हणे ज्याचें नाम विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करी ॥

१ ठिकाण. २ बरोबर. ३ पाणी.

३६४. पाषाणाच्या पोटांत बसलेल्या बेडकास चारा कोण घालतो ?

त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमचें त्या काई असेल ओझें ॥
पाषणाचे पोटीं बैसला दर्दुर[२] । तया मुखीं चार कोण घाली ॥
पक्षी अजगर न करी संचित । तयासि अनंत प्रतिपाळी ॥
तुका म्हणे तया भार घातालिया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥

३६५. आपण दीन होऊन जगास सांकडें घालणें बरें नव्हे.

भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें[३] लाजिरवाणें ॥
ऐसियासि नारायणें । उपेक्षिजे सर्वथा ॥
देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव[४] ।
समर्पिला जीव । नाहीं तो हा व्यभिचार ॥
जगा घालावें सांकडें[५] । दीन होऊनि बापुडें ।
हेंचि अभाग्य रोकडें । मूळ हा अविश्वास ॥
काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार ।
तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ॥

३६६. आपण निर्वाण मांडिल्यास देव आपली उपेक्षा करणार नाहीं.

सांडुनियां सर्व लौकिकाची लाज । आळवा यदुराज भक्तिभावें ॥
पाडुनियां झाडें वरबडूनि पाला । खाऊनि विठ्ठला आळवावें ॥
वेंचूनियां चिंध्या भरूनियां धागा । गुंडाळूनि दुंगा आळवावें ॥
तुका म्हणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया नारायण उपेक्षीना ॥

३६७. जो देवास अनुसरेल त्यास माघार घेण्याचें कारण नाहीं.

अनुसरे त्यासी फिरों नेदी मागें । राहे अंगसंगें समागमें ॥
अंगसंगें असे कर्मसाक्ष देव । जैसा ज्याचा भाव तैसें फळ ॥
फळपाकीं भोग देतील प्राणीये । तुका म्हणे नये सवें कांहीं ॥

१ कंटाळणें. २ बेडूक. ३ जगणें. ४ व्यर्थ. ५ संकट.

३६८. आजपर्यंत कोणीही तुझा दास वायां गेला नसल्यानें आम्हीं तुझी कांस धरली आहे.

तरी आम्ही तुझी धरियेली कास। नाहीं कोणी दास वायां गेला॥
अगा पंढरीशा उभा विटेवरी। येई लवकरी धांवे नेटें[१]॥
पाळविती[२] तुज उभारोनि बाहे। कृपावंता पाहे मजकडे॥
तुका म्हणे तुज बहु कान डोळे। कां हे माझे वेळे ऐसी[३] परी॥

३६९. आपण धीर धरल्यास नारायण आपल्यास साह्य होईल.

धीर तो कारण। साह्य होतो नारायण।
नेदी होऊं सीण। वाहूं चिंता दासांसी॥
सुखें करावें कीर्तन। हर्षें गावे हरिचे गुण।
वारी सुदर्शन। आपणचि कळिकाळ॥
जीव वेंचीं[४] माता। बाळा जडभारी[५] होतां।
तो तों नव्हे दाता। प्राकृता यांसारिखा॥
हें तों माझ्या अनुभवें। अनुभवा आलें जीवें।
तुका म्हणे सत्य व्हावें। आहाच[६] नये[७] कारणा॥

३७०. तुला जे भावानें भजतात त्यांची बरी गति करतोस !

हरि तूं निष्ठुर निर्गुण। नाहीं माया बहु कठिण॥
नव्हे तें करिसी आन। कवणें नाहीं केलें तें॥
घेउनि हरिश्चंद्राचें वैभव। राज्य घोडे भाग्य सर्व।
पुत्र पत्नी जीव। डोंबाघरीं वोपाविलीं॥
नळदमयंतीचा वियोग। विघडिला त्यांचा संग।

१ बळानें. २ बोलावणें. ३ प्रकार. ४ खर्चणें. ५ अडचण, संकट. ६ वरवरचें. ७ उपयोगास येत नाहीं. ८ प्रेम. ९ विकवणें.

ऐसें जाणे जग । पुराणें ही बोलती ॥
राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दयाळु भूपती ।
तुळविलें अंतीं । तुळे मास तयाचें ॥
कर्ण भिडतां समरंगणीं । बाणीं व्यापियेला रणीं ।
मागसी पाडोनि । तेथें दांत तयाचे ॥
बळी सर्वस्वें उदार । जेणें उभारिलां कर ।
करुनि काहा[१]र । तो पाताळीं घातला ॥
श्रियाळाच्या घरीं । धरणें मांडिलें मुरारी ।
मारविलें करीं । त्याचें बाळ त्याहातीं ॥
तुज भावें जे भजती । त्यांच्या संसारा हे गती ।
ठाव नाहीं पुढती । तुका म्हणे करिसी तें ॥

३७१. कोठें न दिसून देव मधेंच उडी घालतो.

आम्हांसाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सू[२]कर ॥
मोहें धांवे घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥
कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचितां[३] ॥
सुख ठेवी आम्हांसाठीं । दुःख आपणाचि घों[४]टी ॥
आम्हां घाली पाठीकडे । आपण कळिकाळासी भिडे ॥
तुका म्हणे कृपानिधी । आम्हां उतरी नावेमधीं ॥

३७२. हरीच्या भक्ताला भयचिंतेचें कारण नाहीं.

हरीचिया भक्ता नाहीं भयचिंता । दुःख निवारिता नारायण ॥
न लगे वाहाणें संसार उद्वे[५]ग । जडों नेदी पां[६]ग देवराय ॥
असों द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळीच ॥
तुका म्हणे माझा सखा पांडुरंग । व्यापियेलें जग तेणें एकें ॥

१ पराकाष्ठेचा त्रास. २ डुक्कर, वराह. ३ एकदम. ४ गिळणें. ५ काळजी. ६ उणीव, दारिद्र्य, अडचण.

३७३. आपण कोल्हाळ केला असतां देव आपणांस खांद्यावर वाहील.

त्रिपुटीच्या[1] योगें । कांहीं नव्हे कोणा जोगें ।
एक जातां लागे । एक पाठीं लागतें ॥
मागें पुढें अवघा काळ । पळों नये नचले बळ ।
करितां कोल्हाळ । कृपें खांदा हरि वाहे ॥
पापपुण्यात्म्याच्या शक्ती । असती योजिल्या श्रीपती ॥
यावें काकुलती । येथें सत्तानायका ॥
तुका उभा पैलथडी । तरि हे प्रकार निवडी ।
घातल्या सांगडी[2] । तांपे[3] पेटे[4], हाकारी[5] ॥

३७४. देवाची इच्छा असल्यास विष तेंही अमृत होईल.

देव राखे तया मारिल कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥
न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तेंही अमृत पाहीं ॥
न चुके वाट न पडे फंदीं[6] । नव्हे कधीं यमबाधा ॥
तुका म्हणे नारायण । येतां गोळ्या वारी बाण ॥

३७५. आपण पावलोंपावलीं देवाचें चिंतन केल्यास देव आपल्यावर पितांबराची छाया करील.

मारगीं चालतां पाउलापाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥
सर्व सुख लागे घेऊनियां पाठीं । आवडीचा कंठीं रस ओती ॥
पीतांबरछाया करी लोभापर । पाहे तें उत्तर आवडीचें ॥
तुका म्हणे हेंचि करावें जीवन । वाचे नारायण तान भूक ॥

---

१ ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय, कर्ता, कर्म, करण वगैरे. २ गोंगाट. ३ ताफे. ४ पेट्या. ५ बोलावणें. ६ कारस्थान.

३७६. देव भक्तांचा ऋणी आहे असें सर्व पुराणें एकरवानें सांगत आहेत.

भक्तऋणी देव बोलती पुराणें । निर्धारवचनें साच खरीं ॥
मागें काय जाणों आइकिली वार्ता । कबिरा सातें जातां घडयां वांटी॥
माघारिया धन आणिलें घरासी । ने घे केला त्यासी त्याग तेणें ॥
नामदेवाचिया घरासी आणिलें । तेणें लुटविलें द्विजां हातीं ॥
प्रत्यक्षासि काय द्यावें हें प्रमाण । एकोबाचें ऋण फेडियेलें ॥
बीज दळोनियां केली आराधना । लागे नारायणा पेरणें तें ॥
तुका म्हणे ऐसा नाहीं ज्या निर्धार । नाडला साचार तोचि एक ॥

३७७. ध्यानास बसलेल्या योगिराजांची तहानभूक ईश्वरास राखावी लागते.

ध्यानीं योगिराज बैसले कपाटीं । लागे पाठोपाठी तयांचियां ॥
तान भूक त्यांचें राखे शीत उष्ण । झाले उदासीन देहभावा ॥
कोण सखे तयां आणिक सोइरे । असे त्यां दुसरें हरीविण ॥
कोण सुख त्यांच्या जीवासी आनंद । नाहीं राज्यमद घडी तया ॥
तुका म्हणे विष अमृतासमान । कृपा नारायण करितां होय ॥

३७८. देव मागें पुढें सांभाळीत असून सर्व आघातांचें निवारण करितो.

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणाचि देव होय गुरु ॥
पढियें देहभाव पुरवी वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥
मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ॥

---

१ बाजार. २ संकटांत पडणें. ३ डोंगराची गुहा. ४ पाठीमागें. ५ आवडतें.

योगक्षेम[1] त्याचें जाणे जड[3]भारी। वाट दावी करीं धरूनियां॥
तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं। पहावें पुराणीं विचारूनि॥

३७९. देव भक्तांचे मनोरथ पूर्ण करितो, पण योग्य वेळ आली पाहिजे.

सत्यसंकल्पाचा दाता नारायण। सर्व करी पूर्ण मनोरथ॥
येथें अळंकार शोभती सकळ। भावबळें फळ इच्छेचें तें॥
अंतरीचें बीज जाणे कळवळा। व्यापक सकळां ब्रम्हांडाचा॥
तुका म्हणे नाहीं चालत तांतडी[4]। प्राप्तकाळ घडी आल्याविण॥

३८०. देव भक्तांचा अंकित होऊन कांहीं माग असें त्यास म्हणतो.

प्रमाण त्याच्या बोला। देव भक्ताचा अंकिला॥
न पुसतां जातां नये। खालीं बैसतांही भिये।
अवघा त्याचा होय। जीवभावासहित॥
वदे उपचारें वाणी। कांहीं माग म्हणऊनि॥
उदासीनाच्या लागे। तुका म्हणे धांवे मागें॥

३८१. निश्चल बसून ध्यान केलें असतां जशी ज्याची इच्छा तशी ती देव पुरवितो.

बैसोनि निश्चळ करीं त्याचें ध्यान। देईल तो अन्नवस्त्र दाता॥
काय आम्हां करणें अधिक सांचुनि। देव झाला ऋणी पुरविता॥
दयाळ मायाळ जाणे कळवळा। शरणांगतां लेळा[5] राखों जाणे॥
नलगे मागणें सांगणें तयासी। जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची॥
तुका म्हणे लेई अळंकार अंगीं। विठ्ठल हा जगीं तूंचि होसी॥

---

१ अप्राप्ताची प्राप्ति. २ प्राप्तवस्तूचें रक्षण. ३ संकट. ४ घाई. ५ हट्ट.

## ३८२. आजपर्यंत भक्तांबद्दल देवानें कोणते चमत्कार केले आहेत.

उंचें[1] नीचें[2] कांहीं नेणे भगवंत । तिष्ठे भावभक्ति देखोनियां ॥
दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्याघरीं रक्षी प्रल्हादासी ॥
चर्म रंगूं लागे रोहिदासासंगें । कबिराचे मागें विणी शेले ॥
सजन कसाया विकूं लागे मांस । माळ्या सांवत्यास खुरपूं लागे ॥
नरहरिसोनारा घडूं फुंकूं लागे । चोख्यामेळयासंगें ढोरें ओढी ॥
नामयाची जनी सवें वेंची शेणी[3] । धर्माघरीं पाणी वाहे झाडी ॥
नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगें ओढी ॥
अर्जुनाचे रथीं होय हा सारथी । भक्षी पोहे प्रीती सुदाम्याचे ॥
गौळियांचे घरीं गाई अंगें वळी । द्वारपाळ बळीद्वारीं झाला ॥
येकोबाचें ऋण फेडी हृषीकेशी । अंबऋषीचे सोशी गर्भवास ॥
मिराबाईसाठीं घेतो विषप्याला । दामाजीचा झाला पाडेवार[4] ॥
घडी माती वाहे गोऱ्या कुंभाराची । हुंडी मेहत्याची अंगें भरी ॥
पुंडलिकासाठीं अझूनि तिष्ठत । तुका म्हणे मात[5] धन्य त्याची ॥

### ३८३. देवानें संतांबद्दल केलेले चमत्कार.

फिरविलें देऊळ जगामाजीं ख्याती । नामदेवा हातीं दूध प्याला ॥
भरियेली हुंडी नरसीमेहत्याची । धनाजीजाटाचीं सेतें पेरी ॥
मिराबाईसाठीं घेतो विषप्याला । लाख्या कोल्हाट्याचा ढोल ठोकी ॥
कबिराचे मागीं विणूं लागे शेले । मूल उठाविलें कुंभाराचें ॥
आतां तुह्मीं दया करा पंढरिराया । तुका विनवी पायां वेळोवेळां ॥

---

१ श्रेष्ठ. २ हीन. ३ गोंवऱ्या. ४ महार. ५ गोष्ट.

## १४. संतांचीं लक्षणें.

३८४. संतांचा निवाडा होण्यास योग्य प्रसंग घडून आले पाहिजेत.

ह्मणावितीं ऐसें आइकतों संत । न देखिजे होत डोळां कोणीं ॥
ऐसियांचा कोण मानितो विश्वास । निवडे तो रस घाईडाई[1][2] ॥
पर्जन्याचे काळीं वोहाळाचे नद । ओरसतां बुंद[3] न थारेचि ॥
हिऱ्या ऐशा गारा दिसती दुरोन । तुका म्हणे घण न भेटे तों ॥

३८५. कवित्वानें, आडनांवानें, किंवा वेषानें संत होत नाहींत.

नव्हती ते संत करितां कवित्व । संतांचे ते आप्त[4] नव्हती संत ॥
येथें नाहीं वेश सरतें[5] आडनांव । निवडे घावडाव[6] व्हावा अंगीं ॥
नव्हती ते संत धरितां भोंपळा । करितां वाकळा[7] प्रावर्णासी[8] ॥
नव्हती ते संत करितां कीर्तनें । सांगतां पुराणें नव्हती संत ।
नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्मआचरणें नव्हती संत ॥
नव्हती संत करितां तप तीर्थाटन । सेविलिया वन नव्हती संत ॥
नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्मउधळणें[9] नव्हती संत ॥
तुका म्हणे नाहीं निरसला[10] देह । तोंवरि हे अवघे संसारिक ॥

३८६. लटकेच डोहाळे दाखविल्यास स्तनांत दूध व पोटांत पोर नसतें.

चिरगुटें घालूनि वाढविलें पोट । गऱ्हैंवार[11] बोभाट जनामध्यें ॥

---

१ योग्यता. २ योग्यसंधीस. ३ थेंब. ४ नातेवाईक. ५ मान्य होणें. ६ सामर्थ्य. ७ गोधडी. ८ पांघरूण. ९ माखणें. १० नाहींसें होणें. ११ गर्भार.

लटिकेचि डोहाळे दाखवी प्रकार । दूध स्तनीं पोर पोटीं नाहीं ॥
तुका म्हणे अंतीं वांझचि ते खरी । फजिती दुसरी जनांमध्यें ॥

### ३८७. तुका भोंदुगुरू ऐसा नाहीं.

कपट कांहीं एक । नेणे भुलवायाचे लोक ॥
तुमचें करितों कीर्तन । गातों उत्तम ते गुण ॥
दाऊं नेणें जडीबुटी[1] । चमत्कार उठाउठी ॥
नाहीं शिष्यशाखा । सांगों अयाचित लोकां ॥
नव्हे मठपति । नाहीं चाहुरांची वृत्ति ॥
नाहीं देवार्चन । असें मांडिलें दुकान ॥
नाहीं वेताळ प्रसन्न । कांहीं सांगों खाणखूण ॥
नव्हे पुराणिक । करणें सांगणें आणिक ॥
नेणें वाद घटा पटा । करितां पंडित करंटा ॥
नाहीं जाळीत भणदीं[2] । उदो[3] म्हणोनि आनंदीं ॥
नाहीं हालवीत माळ । भोवतें मेळऊनि गबाळ[4] ॥
आगमींचें[5] नेणें । स्तंभन मोहन उच्चाटणें ॥
नव्हे यांच्या ऐसा । तुका निरयवासी[6] पिसा[7] ॥

### ३८८. म्हैस जरी पुष्कळ दूध देणारी झाली तरी ती कामधेनूची सरी पावेल काय?

संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥
बहु दुधड[8] जरी झाली म्हैस गाय । तरि होईल काय कामधेनु ॥
तुका म्हणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥

---

१ औषधि, झाडपाला वगैरे. २ डोक्यावर खापरांत घातलेला विस्तव. ३ 'उदयोऽस्तु'चा अपभ्रंश, देवींचे समोर प्रार्थना करतानां ह्मणण्याचा शब्द. ४ टाकाऊ, मूर्ख. ५ शास्त्र, अथर्ववेद. ६ नरकांत राहणारा. ७ वेडा. ८ दूध देणारी.

### ३८९. जडजीवांच्या उद्धरणार्थ व सुखभक्तिच्या प्रसारार्थच संताचा अवतार आहे.

तुम्ही संत मायबाप कृपावंत । काय मी पतित कीर्ती वानूं ॥
अवतार तुम्हां धराया कारण । उद्धरावे जन जडजीव ॥
वाढवाया सुख भक्ति भाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥
तुका म्हणे गुण चंदनाचे अंगीं । तैसे तुम्हीं जगीं संतजन ॥

### ३९०. जो जगाचे आघात सोशील तोच खरा संत.

हिरा ठेवितां ऐरणीं । वांचे मारितां जो घणी ॥
तोचि मोल पावे खरा । करणीचा[1] होय चुरा ॥
मोहरा[2] तोचि अंगें । सूत न जळे ज्याच्या संगें ॥
तुका म्हणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ॥

### ३९१. आपण उपाशीं मरून अमृताची गोडी लाधली असें लोकांस कां सांगतोस ?

नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां हें शुद्ध । जंव आत्मबोध नाहीं चित्तीं ॥
काय करिसी वायां लटिकाचि पाल्हाळ।श्रम तो केवळ जाणिवेचा ॥
मीच देव ऐसें सांगसी या लोकां । विषयांच्या सुखा टोंकोनियां[3]॥
अमृताची गोडी पुढिलां सांगसी । आपण उपवासी मरोनियां ॥
तुका म्हणे जरि राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदित ॥

### ३९२. देवाचा भक्त देवासच प्रिय; त्याची इतरास किंमत नाहीं.

देवाचा भक्त तो देवासीच गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची॥
कवणाचा सोइरा नव्हेच सांगाती । अवघीयां हातीं अंतरला ॥

१ कृत्रिम. २ एक प्रकारचा दगड. ३ आशेनें दृष्टी लावणें.

निष्काम वेडें ह्मणतील बापुडें । अवघिया सांकडें जाला कैसा ॥
माझें ऐसें तया न ह्मणती कोणी । असे रानीं वनीं भलते ठायीं ॥
प्रातःस्नान करी विभूतिचर्चन[1] । देखोनिया जन निंदा करी ॥
कंठीं तुळशीमाळा बैसोनि निराळा । ह्मणती या चांडाळा काय झालें
गातां शंका नाहीं बैसे भलते ठायीं । शिव्या देती आई बाप भाऊ ॥
घरीं बाईल म्हणे कोठें व्याली रांड । बरें होतें षंढ[2] मरतां तरी ॥
जन्मोनि झाला अवघियां वेगळा । म्हणोनि गोपाळा दुर्लभ तो ॥
तुका म्हणे जो संसारा रुसला । तेणेंचि ठाकिला सिद्धपंथ ॥

३९३. भूत, भविष्य, वर्तमान सांगणाऱ्या संतांस येथूनच नमस्कार.

सांगों जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥
त्यांचा आम्हांसी कंटाळा । पाहों नावडती डोळां ॥
ऋद्धिसिद्धींचे साधक । वाचासिद्ध होती एक ॥
तुका म्हणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥

३९४. देवाचें ध्यान करणे इतकेंच आपले काम; होणार तें होतच असतें.

भूत भविष्य कळों यावें वर्तमान । हे तों भाग्यहीन त्यांची जोडी ॥
आम्हीं विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें हो [illegible] रब्धेंचि ॥
जगरूढीसाठीं घातलें दुकान । जातो नारायण अंतरूनि ॥
तुका म्हणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धि ॥

३९५. ज्यानें देवास ओळखिलें तो कोणास भिईल काय ?

देव पाहों देव पाहों । उंचे ठायीं उभे राहों ॥
देव देखिला देव देखिला । तो नाहीं कोणा भ्याला ॥

---

१ भस्म अथवा राख लावणें. २ नपुंसक.

देवासी कांहीं मागों मागों । जीवभाव त्यासीं सांगों ॥
देव जाणे देव जाणे । पुरवी मनींचिये खुणे ॥
देव कातर देव कातर । तुका म्हण अभ्यंतर ॥

३९६. वैष्णवांचे भार पाहून यमदूत पळून जातात.

भार देखोनि वैष्णवांचे । दूर पळाले यमाचे ॥
आले आले वैष्णववीर । काळ कांपती असुर ॥
गरुडटकेयांच्या[2] भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥
तुका म्हणे काळ । पळे देखोनियां बळ ॥

३९७. दुसऱ्यास आत्मवत् लेखणें हेंच संतांचें लक्षण.

करावा संकोच चित्ताचिभोंवता । होय तें बहुता सुख कीजे ॥
देवाची पूजा हे भूतांचें पाळण । मत्सर तो सीण बहुतांचा ॥
रुसावें फुगावें आपुलियावरी । उरला तो हरि सकळही ॥
तुका म्हणे संतपण याचि नांवें । जरि होय जीव सकळांचा ॥

३९८. आम्हांस सोयरे व पिशुन कोणी नसून सर्वत्र देवच भरला आहे.

नाहीं आम्हां शत्रु सोयरे पिशुन । दाटलें हें धन माहियेर ॥
पाहें तेथें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जननिया ॥
लज्जा भय कांहीं आम्हां चिंता नाहीं । सर्व सुखें पायीं वोळंगती[6] ॥
तुका म्हणे आम्ही सुदैवाचीं बाळें । झालों लाडिवाळें सकळांचीं ॥

३९९. रंजलेल्या गांजलेल्यांस जो आपले म्हणतो तोच साधु.

जे कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुलें ॥
तोचि साधु वोळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥

---

१ कात्री. २ गरुडाचें चित्र असलेली ध्वजा. ३ दुष्ट. ४ आईबाप. ५ राधा. ६ सेवा करणें. ७ त्रासलले.

मृदु सबाह्य नवनीत[1] । तैसें सज्जनाचें चित्त ॥
ज्यासि आपंगिता[2] नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥
दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥
तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवंताचि मूर्ति ॥

४००. आम्ही मेणाहून मऊ, पण वज्राहूनही कठीण आहों.

मऊ मेणाहूनि आम्हीं विष्णुदास । कठीण वज्रास भेदूं ऐसे ॥
मेले जित असों निजोनियां जागे । जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥
भले तरि देऊं गांडीची लंगोटी । नाठ्याळाचे काठी देऊं माथां ॥
मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रुहूनि ॥
अमृत तें काय गोड आम्हांपुढें । विष तें बापुडें कडू किती ॥
तुका म्हणे आम्हीं अवघेचि गोड । जया पुरे कोड त्याचेपरी ॥

४०१. जडभारी पडलें असतां जो नेमास टळत नाहीं तोच साधु.

वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥
नाहीं आणीक प्रमाण । तनु[3] धन तृण जन ॥
पडतां जडभारी । नेमा न टळे निर्धारीं ॥
तुका म्हणे याती[4] । हो का तयाची भलती ॥

४०२. जीव दान दिल्याखेरीज संतपण मिळत नाहीं.

नाहीं संतपण मिळत हें हाटीं[5] । हिंडतां कपाटीं रानीं वनीं ॥
नये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥
तुका म्हणे मिळे जिवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलूं नये ॥

४०३. संत हे पुण्यपाप, सुखदुःख, सत्यासत्याहून अतीत आहेत.

पुण्यपापा ठाव नाहीं सुखदुःखा । हानि लाभ शंका नासलिया ॥

---

१ लोणी. २ जवळ करून रक्षण करणारा. ३ शरीर. ४ जात. ५ बाजार.

जितां मरण आलें आपपर गेलें । मूळ हें छेदिलें संसाराचें ॥
अधिकार जात वर्णधर्मजात । ठाव नाहीं सत्यअसत्याशीं ॥
जन वन भिन्न अचेत चळण । नाहीं दुजेंपण ठावें यासी ॥
तुका म्हणे देह वाहिला विठ्ठलीं । तेव्हांच घडली सर्वपूजा ॥

४०४. प्रारब्ध, क्रियमाण, व संचित हा भेद भक्तांस नाहीं.

प्रारब्ध क्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ॥
अवघा देवचि जाला पाहीं । भरोनियां अंतर्बाहीं ॥
सत्वरजतमबाधा । नव्हे हरिभक्तांसि कदा ॥
देवभक्तपण । तुका म्हणे नाहीं भिन्न ॥

४०५. तीर्थामध्यें धोंडापाणी, पण संतांमध्यें देव आहे.

तिर्थीं धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ॥
मिळालिया संतसंग । समर्पितां भलें अंग ॥
तीर्थीं भाव फळे । येथें अनाडें तें वळे ॥
तुका म्हणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ॥

४०६. रवि, दीप, हिरा पाहून काय उपयोग ? संत अदृश्य दर्शनें दाखवितात.

रवि दीप हिरा दाविती देखणें[1] । अदृश्यदर्शनें संतांचेनि ॥
त्यांचा महिमा काय वर्णूं मी पामर[2] । न कळे तो साचार ब्रह्मादिकां ॥
तापली चंदन निववितो कुंडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥
मायबापें पिंड[6] पाळियला मायां । जन्ममरण जाया संतसंग ॥
संतांचें वचन वारी जन्मदुःख । मिष्टान्न तें भूक निवारण ॥
तुका म्हणे जवळी न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया ॥

१ प्रत्यक्ष. २ मूर्ख. ३ दृश्य. ४ हीन, दीन. ५ यथार्थ. ६ शरीर. ७ मोहानें.

### ४०७. देवानें भरलेलें पोतें रिकामें कसें होईल ?

घातला दुकान । देती आलियांसी दान ॥
संत उदार उदार । भरलें अनंत भांडार ॥
मागत्याची पुरे । धणी आणिकांसी उरे ॥
तुका म्हणे पोतें । देवें भरिलें नव्हे रितें ॥

### ४०८. अनुभवाची ही जुनाट खाणी कितीही लुटली तरी संपणार नाहीं.

न सरे लुटितां मागें बहुतांनीं । जुनाट हे खाणी उघडिली ॥
सिद्ध महामुनि साधक संपन्न । तिहीं हें जतन केलें होतें ॥
पायाळाच्या[१] गुणें पाडिलें ठाऊकें । जगा पुंडलीकें दाखविलें ॥
तुका म्हणे तेथें होतों मी दुबळा । आलें या कपाळा थोडें बहु ॥

### ४०९. संतापायींच अविनाशसुख असल्यानें आम्हीं तेथें वास केला आहे.

सुख वाटे येचि ठायीं । बहु पायीं संतांचे ॥
म्हणउनि केला वास । नाहीं नास ते ठायीं ॥
न करवे हाली चाली । निवारिली चिंता हे ॥
तुका म्हणे निवे तनु[२] । रजकणु[३] लागतां ॥

### ४१०. संतांची भेट झाल्यास पाप, ताप, दैन्य उठाउठी नाहींसें होईल.

पाप ताप दैन्य जाय उठाउठीं । झालिया भेटी हरिदासांची ॥
ऐसें बळ नाहीं आणिकांचें अंगीं । तप तीर्थ जगीं दान व्रत ॥
चरणींचें रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्याचे माथां ॥

---

१ पायांकडून जन्मास येणारा. २ शरीर. ३ धुळीचे कण.

भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥
तुका म्हणे मन झालें समाधान । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥

४११. माकडानें सिंहास वांकुल्या दाखविणें म्हणजे मरणच ओढून घेणें आहे.

भुंकुनियां[1] सुनें लागे हत्तीपाठीं । होऊनि हिंपुटी[2] दुःख पावे ॥
काय त्या मशकें[3] तयाचें करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥
मातलें[4] माकड विटंवी[5] पंचानना । घेतलें मरणा धरणें तें ॥
तुका म्हणे संतां पीडितील खळ । येती तोंड काळें करूनियां ॥

४१२. संत ज्याचे घरीं येतात त्याचें सर्वस्व हिरावून नेतात.

वैष्णव चोरटीं । आलीं घरासी करंटीं ॥
आजि आपुलें जतन । करा भांडें पांघरूण ॥
ज्याचे घरीं खावें । त्याचें सर्वस्वही न्यावें ॥
तुका म्हणे माग । नाहीं लागों देत लाग ॥

---

१ खिन्न. २ चिलट. ३ मस्त झालेलें. ४ चिडवणें, वांकुल्या दाखविणें. ५ सिंह.

## १५. देवभक्तांचें ऐक्य.

### ४१३. संत म्हणजेच देव होत.

देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा ॥
मी तों सांगतसें भावें । असो ठावें[1] सकळां ॥
निराकारी ओस दिशा । येथें इच्छा पुरतसे ॥
तुका म्हणे रोकडें केणें[2] । सेवितां येणें पोट धाय ॥

### ४१४. देव व भक्त दोनी एका रूपाचेच भाग आहेत.

देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ॥
भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्याच्या संगें सुख भोगी ॥
देवें भक्तां रूप दिलासे आकार । भक्तीं त्यांचा पार वाखाणिला ॥
एका अंगीं दोन्हीं जालीं हीं निर्माण । देवभक्तपण स्वामीसेवा ॥
तुका म्हणे येथें नाहीं भिन्नभाव । भक्त तोचि देव देव भक्त ॥

### ४१५. तूं अमर आहेस, आणि मी अमर नाहीं काय ?

अमर तूं खरा । नव्हे कैसा मी दातारा ॥
चाल जाऊं संतांपुढें । वाद सांगेन निवाडें[3] ॥
तुज नांव जरी नाहीं । तरी माझें दांव[4] काई ॥
तुज रूप जरी नाहीं । तरी माझें दाव काई ॥
खेळसी तूं लीळा । तेथें मी काय वेगळा ॥
साच तूं लटिका । तैसा मीहि म्हणे तुका ॥

---

१ माहीत. २ माल, जिन्नस. ३ खरोखर. ४ दाखव. ५ कौतुकानें.

४१६. कैंचा भक्त कैंचा देव ! हें सगळें बहुरूप्याचें सोंग आहे.

आम्हीं जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव ।
बीजा नाहीं ठावें[1] । कैंचें फळ शेवटीं ॥
संपादिलें बहुरूप । कैंचें पुण्य कैंचें पाप ।
नव्हतों आम्हीं आप । आपणांसी देखिलें ॥
एके ठायीं घरच्या घरीं । न कळतां जाली चोरी ।
तेथेंचि ते दुरी । जाणें येणें खुंटलें ॥
तुका म्हणे धरूनि हातीं । उरी[2] ठेविली मागुती ।
एकांतीं लोकांतीं । देवभक्ति सोहळा ॥

४१७. बीजापोटीं तरु, व तरूशेवटीं बीज हा संबंध
कायमचाच आहे.

तरुवर बीजा पोटीं । बीज तरुवरा शेवटीं ॥
तैसें तुम्हां आम्हां जालें । एकीं एक सामावलें ॥
उदकावरील तरंग[3] । तरंग उदकाचें अंग ॥
तुका म्हणे बिंब छाया । ठायीं पावली विलया ॥

४१८. देवाशीं अभिन्न असूनही जगांत प्रेमसुख वाढावें म्हणून भक्त
अंगीं भेदभाव दाखवितात.

भक्तांचा महिमा[4] भक्तचि जाणती । दुर्लभ या गति आणिकांसी ॥
जाणोनि नेणते झाले तेणें सुखें । न बोलोनि मुखें बोलताती ॥
अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ॥
टाळघोळ कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥
तुका म्हणे हें तों आहे तयां ठावें । जिहीं एका भावें जाणीतलें ॥

---

१ ठिकाण. २ बाकी. ३ लाट. ४ मोठेपणा, थोरवी.

४१९. जो अंगें आपण देव होईल त्यास इतर लोक देव भासतील.

होईल जाला अंगें देव जो आपण । तयासी हे जन अवघे देव ॥
येरांनीं सांगावी रेमटें[1] काहाणी[2] । चित्ता रंजवणी करावया ॥
धालें[3] आणिकांची नेणे तान भूक । सुखें पाहे सुख आपुलिया ॥
तुका म्हणे येथें पाहिजे अनुभव । शब्दाचें गौरव कामा नये ॥

४२०. एकापरी आम्ही भक्तच देवापेक्षां श्रेष्ठ आहों.

देवासी लागे सकळांसी पोसावें । आम्हां नलगे खावें काय चिंता ॥
देवासी विचारावें लागे पापपुण्य । आम्हांसी हे जन अवघे भले ॥
देवासी उत्पत्ति लागला संहार । आम्हां नाहीं फार थोडें कांहीं ॥
देवासी काम लागला धंदा । आम्हांसी ते सदा रिकामीक ॥
तुका म्हणे आम्ही भले देवाहून । विचारितां गुण सर्वभावें ॥

४२१. भक्तावांचून देवावर सत्ता करणारा कोण आहे ?

भावापुढें बळ । नचले कोणाचें सबळ ॥
करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥
बैसे तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ती ॥
तुका म्हणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥

४२२. आतां मी म्हणेन तें तुजकडून करवीन.

चाल घरा उभा राहे नारायणा । ठेवूं दे चरणावरी माथा ॥
वेळोवेळां देईं क्षेम आलिंगन । करीं अवलोकन कृपादृष्टी ॥
प्रक्षाळूं दे पाय बैसे माजघरीं । चित्त स्थिर करी पांडुरंगा ॥
आहे त्या संचितें करवीन भोजन । काय न जेवून कारिसी आतां ॥

---

१ रिकामी, पोकळ. २ लांबट गोष्ट. ३ तृप्त झालेला.

करुणाकरें नाहीं कळों दिलें वर्म। दूरी होतां भ्रम कोण वारी॥
तुका म्हणे आतां आवडीच्या सत्ता। बोलिलों अनंता करवीन तें॥

४२३. आम्हीं आशा बाजूला सारल्यानें देवापेक्षांही बळी झालों आहोंत.

चवदा भुवनें जयाचिये पोटीं। तोचि आम्हीं कंठीं सांठविला॥
काय एक उणें आमुचिये घरीं। वोळंगती द्वारीं रिद्धिसिद्धि॥
असुर जयानें घातले तोडरीं[1]। तो आम्हांसि जोडी कर दोन्ही॥
रूप नाहीं रेखा जयासी आकार। आम्हीं तो साकार भक्तीं केला॥
अनंत ब्रह्मांडें जयाचिये अंगीं। समान तो मुंगी आम्हांसाठीं॥
तुका म्हणे आम्हीं देवाहुनी बळी। झालों हे निराळी ठेवुनि आशा॥

---

१ जिंकणें.

## १६ निर्गुणविचार.

### ४२४. अचेतच भक्तीच्या सुखानें चेतलें आहे.

लक्षुनियां योगी पाहाती आभास । तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें ॥
कर दोन्ही कटीं राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥
व्यापूनि वेगळें राहिलेंसे दुरी । सकळां अंतरीं निर्विकार ॥
रूप नाहीं रेखा नामही जयासी । आपुल्या मनासीं शिव ध्याये ॥
अंत नाहीं पार वर्णा नाहीं थार । कुळ याति शिर हस्त पाद ॥
अचेत चेतलें भक्तीचिया सुखें । आपुल्या कौतुकें तुका म्हणे ॥

### ४२५. तुकाराम सूर्याप्रमाणें लोकांत क्रीडा करीत आहे.

विश्वीं विश्वंभर । बोले वेदांतीचा सार ॥
जगीं जगदीश । शास्त्रें वदतीं सावकाश ॥
व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥
जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥
सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी ॥

### ४२६. जगव्यापक नारायणाचा साक्षात्कार झाल्यावर शेंदरीं हेंदरीं दैवतें यांस कोण पुसतो ?

सेंदरीं हेंदरीं दैवतें । कोण तीं पूजी भूतें खेतें ।
आपुल्या पोटा जीं रडतें । मागती शितें अवदान ॥
आपुले इच्छे आणिकां पीडी । काय तें देईल बराडी ।
कळों ही आली तयाची जोडी । अल्प रोकडी बुद्धि अधीरा ॥

---

१ आश्रय, ठिकाण. २ शेंदूर लावून तयार केलेली. ३ घाणेरडी, ओंगळ. ४ बळी. ५ आशाळभूत.

दासीचा पाहुणेर उखितें । धणी देईल आपुल्या हातें ।
करुणाभाषण उचितें । हें तों रितें सतत शक्तिहीन ॥
काय तें थिल्लरींचें पाणी । ओठ न भिजे न फिटे धणी ।
सीण तरी आदीं अवसानीं । क्षोभे पुरश्चरणीं दिलें फळ ॥
विलेपनें बुजवितीं तोंड । भार खोळ वाहती उदंड ।
करविती आपणयां दंड । ऐसियांस भांडे म्हणे देव तो ॥
तैसा नव्हे नारायण । जगव्यापक जनार्दन ।
तुका म्हणे त्याचें करा चिंतन । वंदू चरण येती सकळ ॥

४२७. ईश्वर म्हणजे विश्वव्यापक सूत्रच आहे.

देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें । सूत्र ओढें दोरें एका एक ॥
आहाच तें नव्हे विटायासारिखें । जीवजीवनीं देखें सामावलें ॥
आणिकांचें सुखदुःख उमटे अंतरीं । एथील इतरीं तेणें न्यायें ॥
तुका म्हणे ठसावलें शुद्धजातीं । शोभाचि पुढती विशेषता ॥

४२८. तुम्हीं सर्व लोक खरोखर देवच आहां.

अमर आहां अमर आहां । खरें कीं पहा खोटें हें ॥
न म्हणां देह माझा ऐसा । मग भरंवसा कळेल ॥
कैंचा धाक कैंचा धाक । सकाळिक हें आपुलें ॥
देवचि बरे देवचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ॥

४२९. देव आहे असें लोकांत म्हणवावें; पण देव नाहीं असें मनांत जाणावें.

आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥
आवडी आवडी काळिंवरा काळिवरीं । वरिलें अंतरीं ताळा पडे ॥
अपूर्व दर्शन मातेपुत्रा भेटी । रडे मागे तुटी हर्षयोगें ॥
तुका म्हणे एकें कळतें दुसरें । बरियानें बरें आहाचें आहाच ॥

१ डबकें. २ आरंभीं शेवटीं. ३ बेशरम, निर्लज्ज. ४ वाचा. ५ शरीर.

४३०. व्यवहार सत्य म्हणून चालण्यास तुम्हांस आधार काय?

पडिली हे रूढि जगा परिचार[1]। चालविती वेव्हार सत्य म्हूण ॥
मरणाची कांरे नाहीं आठवण। संचिताचें धन लाभ हेवा ॥
देहाचें भय तें काळाचें भातुकें[2]। ग्रासूनि तें एकें ठेविलेंसें ॥
तुका म्हणे कांहीं उघडा रे डोळे। जाणोनि अंधळे होऊं नका ॥

४३१. बीज केवळ खरें; पत्र, पुष्प, फळें ही केवळ मधली उपाधि आहे.

क्षरैला[3] सागर गंगा ओघीं मिळे। आपणचि खेळे आपणांशीं ॥
मधील ते वाँव[4] अवघी उपाधि। तुम्हांआम्हांमधीं तेचि परी[5] ॥
घट मठ झाले आकाशाचे पोटीं। वचनेंचि तुटी तेथोंचि तें ॥
तुका म्हणे बीजें बीज दाखविलें। पत्रें[6] पुष्प आलें गेलें वायां ॥

४३२. देव फटकळ, भक्त भटकळ, देव्हारा फटकळ, व अंगाराही फटकळच आहे.

फटकाँळ[7] देव्हारा फटकाळ अंगारा। फटकाळ विचारा चाळविलें॥
फटकाळ तो देव फटकाळ तो भक्त। करविती घात आणिकां जीवां॥
तुका म्हणे अवघें फटकाळ हें जिणें। अनुभवी ये खुणे जाणतील ॥

४३३. "लटिका तुका, लटिक्या भावें, लटिकें बोलें, लटिक्यासवें."

लटिकें हांसे लटिकें रडे। लटिकें उडे लटिक्यापें ॥
लटिकें माझें लटिकें तुझें। लटिकें ओझें लटिक्याचें ॥
लटिकें गाये लटिकें ध्याये। लटिकें जाये लटिक्यापें ॥
लटिका भोगी लटिका त्यागी। लटिका जोगी जग माया ॥
लटिका तुका लटिक्या भावें। लटिकें बोले लटिक्यासवें ॥

---

१ प्रचार. २ खाद्य. ३ रूपांतर होणें. ४ व्यर्थ. ५ प्रकार. ६ पान. ७ व्यर्थ.

# १७. साक्षात्काराविवरण.

४३४. पुढें गेले त्यांचा मार्ग शोधीत आपण जाऊं.

पुढें गेले त्यांचा शोधीत मारग। चला जाऊं मांग घेत आम्हीं ॥
वंदूं चरणरज सेवूं उष्टावळी। पूर्वकर्मा होळी करुनियां ॥
अमुप हें गांठीं बांधूं भांडवल। अनाथां विठ्ठल आम्हां जोगा ॥
अवघे होती लाभ एका या चिंतनें। नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥
जन्ममरणाच्या खुंटतील खेपा। होईल हा सोपा सिद्ध पंथ ॥
तुका म्हणे घालूं जीवपणा चिरा। जाऊं त्या माहेरा निजाचिया ॥

४३५. जाणत्या लेंकरास माता दूर धरते.

जाणतें लेंकरूं। माता लागे दुरी धरूं ॥
तैसें न करीं कृपावंते। पांडुरंगे माझे माते ॥
नाहीं मुक्ताफळा। भेटी मागुती त्या जळां ॥
तुका म्हणे लोणी। ताक सांडी निवडूनि ॥

४३६. जाणपणानें देवास अंतर पडतें.

धाकुल्याचे मुखीं घांस घाली माता। वरि करि सत्ता शहाणिया ॥
ऐसें जाणपणें पडिलें अंतर। वाढे तों तों थोर अंतराय ॥
दोन्ही उभयतां आपणाचि व्याली। आवडीची चाली भिन्न भिन्न ॥
तुका म्हणे अंगापासूनि निराळें। निवाडिलें बळें रडतें स्तनीं ॥

१ पत्ता. २ मोतीं.

### ४३७. तर्कवाद्यांस देव दूर ठेवितो.

नाहीं त्यांची शंका वैकुंठनायका । नेणती ते एकाविण दुजा ॥
जाणतियां सर्वे येऊं नेदी हरि । तर्कवादी दुरी दुराविले ॥
वादियांशीं भेद निंदा अहंकार । देऊनियां दूर दुराविले ॥
दुराविले दूर आशाबद्ध देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥
चित्तीं द्रव्यदारा पुत्रादिसंपत्ति । समान ते होती पशु नर ॥
नरक साधिला विसरोनि देवा । बुडाले ते भवनदीमाजी ॥
जिहीं हरिसंग केला संवसारीं । तुका म्हणे खरी खेप त्यांची ॥

### ४३८. पिसाट तुक्यास विठ्ठलावांचून दुसरा छंदच नाहीं.

तुका वेडा अविचार[1] । करी बडबड फार ॥
नित्य वाचे हाचि छंद । राम कृष्ण हरि गोविंद ॥
धरी पांडुरंगीं भाव । आणिक नेणे दुजा देव ॥
गुरुज्ञान सर्वां ठायीं । दुजें न विचारी कांहीं ॥
बोल नाइके कोणाचे । कथे नागवाचि नाचे ॥
संगउपचारें कांटाळे । सुखें भलते ठायीं लोळे ॥
कांहीं उपदेशिलें नेणे । वाचे विठ्ठल विठ्ठल म्हणे ॥
केला बहुतीं फजित । तरी हेंचि करी नित्य ॥
अहो पंडित जन । तुका टाकावा थुंकोन ॥

### ४३९. उन्मनीचा दीप लागल्यावांचून केवळ मुद्रांचा काय उपयोग?

अनुहातध्वनि[2] वाहे[3] सकळां पिंडीं[4] । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥
सकळां जीवांमाजी देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥
ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ॥

---

१ मूर्ख, विवेकशून्य. २ एक योगध्वनि. ३ वाजे. ४ शरीर.

काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लगतां उन्मनीचा ॥
का म्हणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुंडेना ॥

### ४४०. मला दंतकथा नकोत, अनुभव पाहिजे.

नका दंतकथा येथें सांगों कोणी । कोरडे ते मानी बोल कोण ॥
अनुभव येथें पाहिजे साचार । न चलती चार आम्हांपुढें ॥
वरि कोण मानी रसाळ बोलणें । नाहीं झालीं मनें ओळखितों ॥
निवडी वेगळें क्षीर[४] आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळालीं ॥
तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें । येरा गबाळाचें काम नाहीं ॥

### ४४१. प्राप्तीच्या पैलतीरीं । विपाइला निघे.

म्हुरा[५] ऐसीं फळें नाहीं । आलीं कांहीं गळतीं ॥
पक्कदशे येतीं थोडीं । नास आढी वेंचे तों ॥
विरुळा[६] पावे विरुळा पावे । अवघड गोवे सेवटाचे ॥
उंच निंच परिवार देवीं । धन्या ठावी चाकरी ॥
झळके तेथें पावे आणी । ऐसे क्षणीं बहु थेडे ॥
पावेल तो पैलथडी । म्हणों गडी आपुला ॥
तुका म्हणे उभाऱ्यानें । खरें कोण मानितसे ॥

### ४४२. यमेवैष वृणुते तेनैव लभ्यः ।

काय साधनाच्या कोटी । केल्या आटी होती त्या ॥
देव कृपा करी जरी । होय उजरी[७] स्वरूपीं ॥
केले होते व्यर्थ श्रम । उपरम[८] न होतां ॥
तुका म्हणे कळों आलें । सर्व जालें आपरूप ॥

---

१ तुर्येचें माजघर, मनरहित स्थिति. २ स्वाधीन होणें. ३ चाळे, वेड्यावांकड्या चेष्टा. ४ दूध. ५ मोहोर. ६ क्वचित्. ७ प्रकाश. ८ उपरति, विरक्ति.

### ४४३. देवाच्या मनास आलें तर हेच चक्षु दिव्य होतील.

जरि हा हो कृपा करिल नारायण । तरी हेंचि ज्ञान ब्रह्म होय ॥
कोठेनियां कांहीं नलगे आणावें । नलगे कोठें जावें तरावया ॥
जरी देव कांहीं धरिल पैं चित्तीं । तरि हेचि होति दिव्य चक्षु ॥
तुका म्हणे जरि देव दावील आपणा । तरि जीवपणा ठाव नाहीं ॥

### ४४४. उठाउठी स्मरणाचा धांवा केल्यावर देवास धीर धरवत नाहीं.

शुकासनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षिती लाहो दिसां सातां ॥
उठाउठी करी स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥
त्वरा जाली गरुड टाकियेला मागें । द्रौपदीच्या लागें नारायणें ॥
तुका म्हणे करी बहुच तांतडी । प्रेमाची आवडी लोभा फार ॥

### ४४५. देवाचें ध्यान केलें असतां मनासहित काया पालटते.

ध्यानीं ध्यातां पंढरिराया । मनासहित पालटे काया ॥
तेथें बोला कैंची उरी । माझें मीपण झाला हरि ॥
चित्त चैतन्यीं पडतां मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टि ॥
तुका म्हणे सांगों काय । एकाएकीं हरिवृत्तिमय ॥

### ४४६. तुझ्यावांचून दुसऱ्याची कीर्ति वर्णीन तर शपथ.

तुजविण वाणी आणिकांची थोरी । तरी माझी हरि जिह्वा झडो ॥
तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥
नेत्रीं आणिकांसी पाहीन आवडी । जातु तेचि घडी चांडाळ हे ॥
कथामृतपान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ॥
तुका म्हणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां ॥

---

१ लाभ. २ त्वरित. ३ बाकी. ४ वर्णन करणें. ५ जावोत.

### ४४७. तुमचीं सगळीं इंद्रियें शाबूत असून तुम्हीं देवाचें ध्यान कां करीत नाहीं ?

सदैव तुम्हां अवघें आहे। हातपाय चालाया ॥
मुखीं वाणी कानीं कीर्ति। डोळे मूर्ति देखाया ॥
अंधबहिर ठकलीं कितीं। मुकीं होतीं पांगुळें ॥
घरा आगी लावूनि जागा। न पळे तो गा वांचेना ॥
तुका म्हणे जागा हिता। कांहीं आतां आपुल्या ॥

### ४४८. माझीं इंद्रियें एकामेकांबरोबर भांडावयास लागलीं आहेत.

माझ्या इंद्रियांसी लागलें भांडण। म्हणतील कान रसना धाली ॥
करिती तळमळ हस्तपाद[1]भाळ। नेत्रांसी दुकाळ पडिला थोर ॥
गुण गाय मुख आइकती कान। आमचें कारण तैसें नव्हे ॥
दरुषणें फिटे नेत्रांचा तो पांग। जेथें ज्याचा भाग घेईल तें ॥
तुका म्हणे ऐसें करी नारायणा। माझी ही वासना ऐसी आहे ॥

### ४४९. विषयांकडे जसें तुझें प्रेम आहे तसें देवाकडे कां नाहीं?

देवाचें भजन कां रे न करिसी तैसें। अखंड द्रव्यासीं पीडितोसि ॥
देवासी शरण कां रे न वजसी तैसा। बक मीनीं जैसा मनुष्यालागीं ॥
देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा। पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ॥
कां रे नाहीं तैसी देवाची ते गोडी। नागवूनि सोडी पत्नी जैसी ॥
कां रे नाहीं तैसे देवाचे उपकार। माया मिथ्या भार पितृपूजन ॥
कां रे भय बाहासी लोकांचा तूं धाक। विसरोनियां एक नारायण ॥
तुका म्हणे कां रे घातलेसें वायां। सर्व आयुष्य जायां भक्तीविण ॥

---

१ फसणें. २ कपाळ. ३ दुष्काळ. ४ छंद. ५ जाणें. ६ मासा.

### ४५०. " लाजेला थार देऊं नका हो " असा देवाच्या नांवानें मी डांगोरा पिटतों.

देवांच्या निरोपें पिटीतों डांगोरा । लाजे नका थारा देऊं कोणी ॥
मोडिले रांडेनें सुपंथ मारग । चालाविलें जग यमपंथें ॥
परिचारी[1] केली आपुलीच रूढी[2] । पोटींची ते कुडी[3] ठावी नाहीं ॥
तुका म्हणे आणा राउळा[4] धरून । फजित करून सोडूं मग ॥

### ४५१. जोंपर्यंत नेत्रांतून जळ वहात नाहीं तोंपर्यंत सगळी बडबड व्यर्थ आहे.

नये नेत्रीं जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥
तों हे चार्वटीचे[5] बोल । जन रंजवणें फोल ॥
न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ॥
तुका म्हणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥

### ४५२. मन स्थिर होण्यास अनुभवदृढतेवांचून दुसरें साधनच नाहीं.

अनुभवें अनुभव अवघाचि साधिला । तरि स्थिरावला मनु ठायीं ॥
पिटूनियां मुसे आला अळंकार । दग्ध तें असार होऊनियां ॥
एकचि उरलें कायावाचामना । आनंद भुवनामाजीं त्रयीं ॥
तुका म्हणे आम्हीं जिंकिला संसार । होऊनि किंकर विठोबाचे ॥

### ४५३. मी ज्याची इच्छा करीत होतों तें प्राप्त झाल्यानें आतां मौन्यच धरलेलें बरें.

इच्छावें तें जवळीं आलें । काय बोले कारण ॥
नामरूपीं पडिली गांठी । अवघ्या गोष्टी सरल्या ॥

---

१ दंवडी. २ रूढ. ३ व्यवहार. ४ कपटी. ५ देऊळ. ६ बडबड.

मुक्तियाचे परि जीवीं । साखर जेवीं खादली ॥
तुका म्हणे काय बोले । आतां भलें मौन्यचि ॥

४५४. रक्त, श्वेत, पीत अंजनानें माझी दृष्टि दिव्य झाली आहे.

रक्तं[1] श्वेतं[2] कृष्णं[3] पीतं[4] प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें[5] डोळां ॥
तेणें अंजनेंगुणें[6] दिव्य दृष्टी झाली । कल्पना निवाली द्वैताद्वैत ॥
देशकालवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळलों[7] विश्वाकार ॥
न झाला प्रपंच आहे परब्रह्म । अहं सोहं ब्रह्म आकळलें[8] ॥
तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग । तेंचि झाला अंगें तुका आतां ॥

४५५. डोळ्यांत अंजन घातल्यावर सर्वत्र प्रकाश भरलेला दिसतो.

कळेल हे खूण । तरि दावी नारायण ॥
सत्य संतांपाशीं राहे । येरां भय आड आहे ॥
अणूचियां ऐसें । असे भरलें प्रकाशें ॥
इंद्रियांचे धनी । ते हे जाती समजूनी ॥
तर्क कुतर्क वाटा । नागवण[9] घटापटा ॥
तुका म्हणे ल्यावें । डोळां अंजन बरवें ॥

४५६. देवाच्या पायांवर माथा ठेवावा तो उचलूं नये.

लौकिकासाठीं या पसाऱ्याचा गोवा । कांहीं नाहीं देवा लागों येत ॥
ठेवावा माथा तो नुचलावा पायीं । ठायींचिये ठायीं हालों नये ॥
ढवाळिल्या मन वितुळेल रूप । नांव ऐसें पाप उपाधीचें ॥
तुका म्हणे देव प्रीतीनें कवळीं[10] । ठेवील जवळी उठवूनि ॥

---

१ तांबडें. २ पांढरें. ३ काळें. ४ पिंवळें. ५ घातलें. ६ अंजनामुळें. ७ निर्मळ होणें, प्रकाशणें. ८ स्वाधीन होणें. ९ लुटी. १० आलिंगन देणें.

४५७. जिकडे पाहीन तिकडे मायबाप विठ्ठलरखुमाई आहे.

जन विजन झालें आम्हां । विठ्ठलनामाप्रमाणें ॥
पाहे तिकडे मायबाप । विठ्ठल आहे रखुमाई ॥
वन पट्टणें[2] एक भाव । अवघा ठाव सरता झाला ॥
आठव नाहीं सुखदुःखा । नाचे तुका कौतुकें ॥

४५८. आतां एकांत सेवून काय उपयोग ? या जनांतच आनंद भरलेला आहे.

काय ते विरक्ति न कळेचि आम्हां । जाणों एका नामा विठोबाच्या ॥
नाचेन मी सुखें वैष्णवांचे मेळीं । दिंडी टाळ घोळीं आनंदें या ॥
शांति क्षमा दया हे मी काय जाणें । विठ्ठलकीर्तनें वांचूनियां ॥
कासया उदास होऊं देहावरी । अमृतसागरीं बुडोनियां ॥
कासया एकांत सेवूं तया वना । आनंद या जनामाजी असे ॥
तुका म्हणे मज आहे हा भरंवसा । विठ्ठल सरिसा चालतसे ॥

४५९. देवभक्तनामाचा त्रिवेणीसंगम.

पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्व काळ ॥
तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील राशी पातकाच्या ॥
देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥
काय त्या उरलें वेगळें आणीक । वैकुंठनायक जयां कंठीं ॥
तुका म्हणे देव भक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥

४६०. हरिकीर्ति गात जाणाऱ्या भक्ताबरोबर अनंत हिंडतो.

कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पंढरीचा राव संगीं आहे ॥
भक्त जाय सदा हरिकीर्ति गात । त्यासवें अनंत हिंडतसे ॥

१ अरण्य. २ शहर. ३ वाणा.

त्रैलोक्य भ्रमण करीत नारद । त्यासवें गोविंद फिरतसे ॥
नारद मंजुळ सुस्वरें गीत गाये । मार्गीं चालताहे संगें हरि ॥
तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची । नाहीं आणिकांची प्रीति ऐसी ॥

## ४६१. अतिसुखाहून सोलींव सुख तें वैष्णवांच्या अंगणांत उभें आहे.

सोलींव जें सुख अतिसुखाहूनि । उभें तें अंगणीं वैष्णवांच्या ॥
वृंदावन सडे चौक रंग माळा । नाचतो सोहळा देखोनियां ॥
भूषण मंडित सदा सर्वकाळ । मुद्रा आणि माळ तुळशी कंठीं ॥
नाम ओघ मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र सहित रजें ।
तुका म्हणे मोक्ष भक्ताचिया मना । नये हे वासना त्यांची करी ॥

## ४६२. आपण निजून नामसंकीर्तन केलें असतां नारायण उभ्यानें ऐकतो.

निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ॥
उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे हा गोविंद नाना छंदें ॥
मारगीं चालतां मुखीं नाम वाणी । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥
तुका म्हणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाठीं ॥

## ४६३. देव आपला हात उभारून आवडीचें दान भक्तांस देतो.

आवडीचें दान देतो नारायण । बाहे[1] उभारोन राहिलासे ॥
जें जयासी रुचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥
ठायीं पडिलिया तेंचि लागे खावें । ठायींचेंचि घ्यावें विचारूनि ॥
बीज पेरूनियां तेंचि घ्यावें फळ । डोरलीस[2] केळ कैचें लागे ॥
तुका म्हणे देवा बोल कांहीं नाहीं । तुझा तूंचि पाहीं शत्रु सखा ॥

१ हात. २ वांग्याची एक जात.

### ४६४. देव भक्ताचें सर्व काम न सांगतां करतो.

भक्ता समागमें सर्वभावें हरि । सर्व काम करी न सांगतां ॥
सांठवला राहे हृदयसंपुष्टीं[1] । बाहेर धाकुटी मूर्ति उभा ॥
मागण्याची आस पाहे मुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥
तुका म्हणे जीवभाव देवापायीं । ठेवूनि कांहीं न मागती ॥

### ४६५. नारायणसंभोगांत तल्लीनता.

आलिंगन कंठाकंठीं । पडे मिठी सर्वांगें ॥
न घडे मागें परतें मन । नारायण संभोगी ॥
वचनासी वचन मिळे । रिघती डोळे डोळियांत ॥
तुका म्हणे अंतर्ध्यानीं । जीव जीवनीं विराल्या ॥

### ४६६. तुम्हांस काय पाहिजे तें देवाजवळ मागा, व त्यास आपलें दुःख निवेदन करा.

उठा सकळ जन उठले नारायण । आनंदले मुनिजन तिन्ही लोक ॥
करा जयजयकार वाद्यांचा गजर । मृदंग विणे अपार टाळ घोळ ॥
जोडोनियां कर मुख पाहा सादर । पायांवरि शिर ठेवूनियां ॥
तुका म्हणे काय पढियंतें[2] मागा । आपुलालें सांगा दुःख सकळ ॥

### ४६७. ज्यास हरीचें साहाय्य प्राप्त होतें त्याच्या अंगणांतील लता कल्पलता बनतात.

सर्वपक्षीं हरि साहे सखा झाला । ओल्या अंगणींच्या कल्पलता त्याला ॥
सहज चाली चालतां पायवाटे । चिंतामणिसमान होती गोटे ॥
तुका तरी सहज बोले वाणी । त्याचे घरीं वेदांत वाहे पाणी ॥

---

१ हृदयरूपी देव ठेवण्याचें पात्र. २ आवडेल तें.

## ४६८. शेवटचा दिवस गोड व्हावा म्हणूनच इतका अट्टाहास आजवर केला होता.

याजसाठीं केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ।
आतां निश्चितीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥
कवतुक वाटे जालिया वेंचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ।
तुका म्हणे मुक्ति परिणिली[1] नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळी ॥

---

१ लग्न लावणें.

## १८. रूपकें.

### ४६९. नामरूपी शेत पिकीव.

सेत करारे फुकाचें । नाम विठोबारायाचें ॥
नाहीं वेठी[1] जेवां[2] सारा[3] । जाहाती[4] नाहीं म्हाणियारा ॥
सरिक नाहीं दुसरा । धनी सारा तुझा तूं ॥
जपतप नांगरणी । नलगे आटी दुनवणी ॥
कर्म कुळेवणी[5] । नलगे धर्मपाळी दोन्ही ॥
ज्ञानपाभारी[6] ती फणी । नलगे करावी पेरणी ॥
बीज नलगे संचिताचें । पीक पिकलें ठायींचें ॥
नाहीं यमाचें चोरटें । विठ्ठल पागोऱ्यांच्या[7] नेटें[8] ॥
पीक न वजे हा भरंवसा । करी उद्वेग तो पिसा ॥
सरांई[9] सर्व काळ । वायां न वजे घटिकापळ ॥
प्रेम पिकलें अपार । नाहीं सांठवावया थार ॥
ऐसी जोडी जो चुकला । तुका म्हणे धिग त्याला ॥

### ४७०. निजूं नको: जागा राहून शेत राख.

बोणव्या सोंकरीं[10] । सेत खादलें पाखरीं ॥
तैसा खाऊं नको दगा । निदसुरा[11] राहुनी जागा ॥
चोरासवें वाट । चालोनि केलें तळपट[12] ॥
डोळे झांकुनी राती । कूंपीं[13] पडे दिवसा ज्योती ॥

---

१ बिगारी. २ अन्नखर्च. ३ सरकारपट्टी. ४ जुलूम. ५ ढेंकळें मारून जमीन साफ करणें. ६ शेतांत बीं पेरण्याचें औत. ७ गोफण. ८ बळानें. ९ हंगाम. १० राखणदार. ११ अर्धवट झोपेंत असलेला, अज्ञान. १२ वाटोळें. १३ खड्डा, आड.

पोसी वांझ गाय । तेथें कैंची दूध साय ॥
फुटकी सांगडी । तुका म्हणे न पवे थडी ॥

४७१. शेताची मळणी करून ज्याचा भाग त्याला दे.

सेत आलें सुगी सांभाळावे चारी कोन ।
पिक आलें परी केलें पाहिजे जतन ॥
सोंकरीं सोंकरीं सोहंकरीं ।
विसांवा तोंवरीं नको उभें आहे तों ॥
गोफणीस गुंडा घाली पागोऱ्याच्या नेटें ।
पळती हाहाकारें अवघीं पाखरांचीं थाटें ॥
पेटवूनी आगटी राहे जागा पालटुनी ।
पडलिया मानीं वळ बुद्धि व्हावी दोन्हीं ॥
खळे दाणे विश्व सुखी करी हातां रासी ।
सारा सारुनियां ज्याचे भाग देई त्यासी ॥
तुका म्हणे मग नाहीं आपुलें कारण ।
निज आलें हातां भूस सांडलें निकणें ॥

४७२. अनुभवरूपी पाकाची सिद्धि.

सावडीं कांडण ओवी नारायण । निवडी आपण भूस सार ॥
मुसळ आधारीं आवरूनि धरीं । सांवरूनी थोरी घाव घालीं ॥
वाजती कांकणें अनुहातगजरें । छंद माहियेरे गाऊं गीतीं ॥
कांडितां कांडण नव्हे भाग शीण । तुजमजपण निवडे तों ॥
तुका म्हणे रूप उमटे आरिसा । पाक त्यासारिसा सिद्ध झाला ॥

४७३. सरवदा सांगतो कीं जो खरें बोलेल तो नरकाला जाईल.

ऐका गा ए भाई । सर्वदा सांगतो काई ॥

---

१ हंगाम. २ संभाळ करणें. ३ दगड. ४ समुदाय. ५ दाणे काढून घेतलले कणीस. ६ भविष्य सांगणारा.

येथे नाडेल माई । दोघां पुत्रांची ॥
ते करिती तिची विटंबना । अवघ्या प्रसिद्ध जना ॥
एक न मारितां शाहाणा । तो जाण सुख न पवे ॥
आणीक ऐका ऐका गा ए । सरवदा सांगतो काये ॥
खरें बोले तो जाये । नरकामध्यें अधोगती ॥
हें चौघांच्या मुखें । मना आणावें सुखें ॥
अवघीं चुकतील दुःखें । खोटें बोला नरनारी ॥
आणीक नाडेल एक जाण । सरवदा बोलतो वचन ॥
जागें माझें चित्त म्हणोन । पडिलें खान तया घरीं ॥
म्हणोनि न म्हणा माझें कांहीं । निजीं निजा सुखें ठायीं ।
यत्न होईल तई । चोराठायीं विश्वास ॥
आणीक एकी परी । सरवदा सांगतो थोरी ॥
दुःख पावेल नारी । पतिव्रता या मधीं॥
पांचांनीं दिधली हातीं । म्हणोनि न मानावी निश्चिती ॥
परपुरुषीं होय रति । सुखगति ते पावे ॥
आणीक एकी परी । सरवदा सांगतो तें करी ॥
दान देतां जो वारी । नव्हे भला भला तो ॥
तुका म्हणे आई । येथें नांव काई । सांगसी तें ठायीं । मरो रांडेचें ॥

४७४. कुलस्वामिनीपुढें अनाहताचा डंका वाजवून मनरूपी मेंढा मारा.

चौकं[४] भरियेला आसनीं । पाचारिली कुळस्वामिनी ।

---

१ संकटांत पडणें. २ आई. ३ चोरी. ४ देवीला बसण्याकरतां पाटावर वस्त्र ठेवून त्यावर गहूं तांदूळ वगैरे धान्याची केलेली चतुष्कोणी आकृति.

वैकुंठवासिनी । ये धांवोनी झडकरी ॥
रंगा येई वो विठाई । सांवळिये डोळसे ॥
तुझें श्रीमुख साजिरें । तें मी केधवां देखेन ॥
रजतमधूपारती । पंचप्राणाची आरती ।
अवघी सारोनी[१] आइती । ये धांवत झडकरी ॥
मन मारोनिया मेंढा[२] मुठीं । आशा मनशा तृष्णा सुटी ॥
भक्तिभाव नैवेद्य ताटीं । भरोनी केला हाकारा ॥
डांका[३] अनुहात गजरें । येउनि अंगासी संचरे ।
आपुला घेऊनि पुरस्कार[४] । आरोग्य करी तुकयातें ॥

४७५. आजपर्यंत कित्येकांचीं कोडीं देवीनें पुरविलीं आहेत.

साच माझा देव्हारा । भाक ठेवा भाव खरा ।
त्रिगुणांचा फुलवरा । आणा विनंति सांगतों ॥
माझें दैवत हे रंगीं । नाचे वैष्णवांच्या संगीं ।
भरलें मग अंगीं । निवाड करी दोहींचा ॥
तुझें आहे तुजपाशीं । परि तूं जागा चुकलासी ।
चिवडूनियां नाशी । तुझ्या घरिच्यांनीं केली ॥
आतां न पडे ठावें । वांचूनिया माझ्या देवें ।
अंधकारें व्हावें । नासु ठाव शोधावा ॥
आंधळ्यासी डोळे । देते पांगुळासी पाय ।
वांझा पुत्र होय । नवस पुरविते विठाई ॥
उगोंविलीं[५] कोडीं[६] । मागें कित्येकांचीं बापुडीं ।
तुका म्हणे घडी । न लगे नवस द्या आधीं ॥

---

१ सामग्री. २ बकरा. ३ मोठा नगारा. ४ पूजोपचार. ५ उकलणें. ६ गुह्य.

४७६. कुळींच्या कुलदेवतेपुढें असुर कांपत असले तरी आम्हांस ती माताच आहे.

खेचर खडतर। काळ कांपती असुर।
नांदे भीमातीर। पंढरपुरपाटणीं॥
आतां करीं कां रे हांकारा। सहस्रनामें एकसरा।
दवडिते खेचरा। अंगसंगें धरूनी।
सीते झाली झडपणी। राहाणें वासुगीच्या बनीं।
पावली जननी। झोंटि मोकळीया केशी॥
लाविलें कावरें। प्रल्हादा म्हैसासुरें।
आली एकसरें। दांत खात रंगासी॥
वसुदेवाची बाळें। सात खादलीं ज्या काळें।
आली भोगवेळे। तयाकारणें तेथें॥
पांडवें बापुडीं। वाजें केलीं फिरती वेडीं।
धांवोनियां काढी। अंगसंगें आहांटांवेलीं॥
नामाचें चिंतन। तेथें धांवते आपण।
न विचारिते हीण। भाव देखे जयाचा॥
कुळींची कुळदेवता। तुका म्हणे आम्हां माता।
काय भय भूतां। काळ यमदूतांचें॥

४७७. माझ्या अंगांत खडतर देवता संचरली असल्यानें मला चंद्रभागेतीरीं नेऊन घाला.

झाली झडपणी खडतर देवता। संचरली आतां निघों नये॥
मज उपचार झणी आतां करा। न साहे दुसरा भार कांहीं॥
नेऊनियां घाला चंद्रभागेतीरीं। जीवा नाहीं उरी कांहीं आतां॥
तुका म्हणे कळों आलें वर्तमान। माझें तों वचन आच्छादलें॥

१ पिशाच. २ बोलावणें. ३ एकदम. ४ अशोक. ५ हिरण्यकश्यपु हा हिरण्याक्ष. ६ निष्फळ. ७ प्रांतपदस चढवणें.

# १९ व्यवहारचातुर्य.

## ४७८. लावण्य हें दुःखमूळ आहे.

स्त्रियांचा तो संग नको नारायणा। काष्ठा या पाषाणा मृत्तिकेच्या॥
नाठवे हा देव न घडे भजन। लांचावलें मन आवरेना॥
दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें। लावण्य तें खरें दुःखमूळ॥
तुका म्हणे जरी अग्नि झाला साधु। तरी पावे बाधु संघट्टणें॥

## ४७९. संतांचा कंटाळा करून परस्त्रीस मात्र आदरानें पाहतो.

संत देखोनियां स्वयें दृष्टी टाळी। आदरें न्याहाळी परस्त्रीसी॥
वीट ये कर्णासी संतवाक्यामृता। स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण॥
कथेमाजीं नीज वाढे नित्यक्षणीं। स्त्रियेचे कीर्तनीं प्रेमें जागे॥
तुका म्हणे तुम्हीं क्रोधासी न यावें। स्वभावा करावें काय कोणीं॥

## ४८०. मेघ आकाशांत आले कीं मयूर नाचलाच.

न लगे चंदना पुसावा परिमळ। वनस्पतिमेळ हाकारूनी॥
अंतरीचें धांवे स्वभावें बाहेरी। धरितांही परी आवरेना॥
सूर्य नाहीं जागे करीत या जना। प्रकाश किरणा कर म्हूण[2]॥
तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें। लपवितां खरें येत नाहीं॥

## ४८१. रांगोळीचा खडा हिऱ्याप्रमाणें चमकतो, पण पारखी त्याकडे पहात सुद्धां नाहींत.

तांबियाचें नाणें न चले खऱ्या मोलें। जरी हिंडविलें देशोदेशीं॥
करणीचें[3] कांहीं न मने सज्जना। यावें लागे मना वृद्धांचिया॥

१ संवकर्णे. २ म्हणून. ३ कात्रिम.

हिरियासारिखा दिसे शिरगोळा[1] । पारखी तो डोळां न पाहाती ॥
देऊनियां भिंगें[2] कामाविलें मोतीं । पारखियां हातीं घेतां नये ॥
तुका म्हणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग्वाही[3] ॥

४८२. ज्याचे अंगीं मोठेपण त्यास कठीण यातना भोगाव्या लागतात.

लहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥
ऐरावत रत्न थोर । त्यासी अंकुशाचा मार ॥
ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठीण ॥
तुका म्हणे जाण । व्हावें लहानाहुनि लहान ॥

४८३. महापुरामध्यें झाडें वाहून जातात, पण लव्हाळे वांचतात.

नीचपण बरें देवा । न चले कोणाचाही दावा ॥
महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहती ॥
येता सिंधूच्या[4] लहरी[5] । नम्र होतां जाती वरी ॥
तुका म्हणे कळ[6] । पाय धरिल्या न चले बळ ॥

४८४. कल्पतरूखालीं बसलें असतां मागितलेलीं फळें प्राप्त होतात.

कल्पतरूखालीं । फळें येतीं मागितलीं ॥
तेथें बैसल्याचा भाव । विचारूनि बोले ठाव ॥
द्यावें तें उत्तर । येतो प्रीतीचा तो फेर ॥
तुका म्हणे मनीं । आपुल्याचि लाभहानी ॥

४८५. अज्ञानी मनुष्याचें ध्यान विषयांकडे असल्यानें त्यास सनातन ब्रह्म कसें प्राप्त होईल?

अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचिये चित्तीं बोध कैंचा ॥
अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैंचा ॥

---

१ गारगोटी. २ अभ्रकाचें पुट देणें. ३ साक्ष. ४ समुद्र. ५ लाटा. ६ युक्ति.

अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैंचें ॥
अज्ञानाचें ज्ञान विषयावरी ध्यान । ब्रह्म सनातन तया कैंचें ॥
तुका म्हणे जळो पेशियांचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥

### ४८६. पुराणिकाची दाढी पाहून एका बाईस आपल्या बोकडाची आठवण झाली.

देखोनि पुराणिकाची दाढी । रडे फुंदे[1] नाक ओढी ॥
प्रेम खरें दिसे जनां । भिन्न अंतरीं भावना ॥
आवरितां नावरे । खुर[2] आठवी नेवरे[3] ॥
बोलों नये मुखावाटां । म्हणे होता ब्यांचा तोटा ॥
दोन्ही सिंगें चारी पाय । खुणा दावी म्हणे होय ॥
मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥
होता भाव पोटीं । मुखा आलासे सेवटीं ॥
तुका म्हणे कुडें । कळों येतें तें रोकडें ॥

### ४८७. तुला एक शेर अन्नाची चाड आहे, विनाकारण तृष्णा कां वाढवितोस?

एक शेरा अन्ना चाड । येर वाउगी बडबड ॥
कां रे तृष्णा वाढविसी । बांधवूनि मोहपाशीं ॥
औट हात तुझा जागा । येर सिणसी वाउगा ॥
तुका म्हणे श्रम । एक विसरतां राम ॥

### ४८८. जो आपल्या घरास आग लावतो त्यास राहण्यास कोठें जागा आहे?

मातेचीं जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥
वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकिया खळ ।

---

१ हुंदका येणें. २ खूर, नखी. ३ साडेतीन.

आगी लावी घरा । मग वसती कोठें थारा[1] ॥
तुका म्हणे वर्म । येरा नाचवितो भ्रम ॥

४८९. धनमान, सुखदुःख, प्रारब्धानेंच प्राप्त होतात.

प्रारब्धेंचि जोडे धन । प्रारब्धेंचि वाढे मान ॥
सोस करिसी वायां । भज मना पंढरीराया ॥
प्रारब्धेंचि होय सुख । प्रारब्धेंचि पावे दुःख ॥
प्रारब्धेंचि भरे पोट । तुका करीना बोभाट ॥

४९०. खलदुर्जन कांहीं मोल न घेतां आमच्या देहाची पासोडी शुद्ध करितात.

असो खळ ऐसे फार । आम्हां त्यांचे उपकार ।
करिती पातकांची धुणी । मोल न घेतां साबणीं ।
फुकाचे मजूर । ओझें वागविती भार ॥
पार उतरून म्हणे तुका । आम्हां आपण जाती नरका ॥

४९१. जो विनाकारण निंदा करितो तो मागच्या जन्मीं परीट किंवा न्हावी असावा.

जन्मांतरींचा परीट न्हावी । जात ठांवी त्यानें ते ॥
वाखर[2] जैसा चरचरी । तोंड करी संवदणी[3] ॥
पूर्वजन्मीं शिखासूत्र । मळमूत्र अंतरीं ॥
तुका म्हणे करिती निंदा । धुवटधंदा पुढिलांचा ॥

४९२. गुरूनें मेघदृष्टीनें उपदेश करावा, पण शिष्य करूं नये.

मेघवृष्टीनें करावा उपदेश । परि गुरूनें न करावा शिष्य ।

---

१ ठाऊक, माहीत. २ वस्तरा. ३ परटाचें कपडे धुण्याचें पात्र.

वांटा लाभे त्यास । केल्या अर्धकर्माचा ॥
द्रव्य वेंचावें अन्नछत्रीं । भूतीं द्यावें सर्वत्र ।
न घ्यावा हा पुत्र । उत्तम याती पोसणा[1] ॥
बीज न पेरावें खडकीं । ओल नाहीं ज्याचे बुडखीं ।
थीतां ठके सेखीं । पाठीं लागे दिवाणें[2] ॥
गुज बोलावें संताशीं । पत्नी राखावी जैसी दासी ।
लाड देतां तियेसी । वांटा पावे कर्माचा ॥
शुद्ध कसूनि पाहावें । वरिल रंगा न भुलावें ।
तुका म्हणे घ्यावें । जया नये तुटी तें ॥

४९३. मुंगीवर हत्तीची झूल घालण्यांत उपयोग काय ?

अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥
मुंगीवरी भार गजाचें पालाण[3] । घालितां ते कोण कार्यसिद्धि ॥
तुका म्हणे फांसे[4] वागुरा[5] कुऱ्हाडी । प्रसंगीं ते काढी पारधी तो ॥

४९४. संतसंगतींत वास करूं नये; कारण एखादेवेळीं त्यांचे गुणदोष अंगीं यावयाचे !

संतसंगतीं न करावा वास । एखादे गुणदोष अंगा येती ॥
मग तया दोषा नाहीं परिहार[6] । होय अपहार सुकृताचा ॥
तुका म्हणे नमस्कारावे दुरून । अंतरीं धरून राहे रूप ॥

४९५. संसारयात्रेस आलेल्या लोकांनीं तुटीचा माल भरूं नये.

संवसारसांते[7] आले हो आइका । तुटीचें[8] तें नका केणें[9] भरूं ॥
लाभाचा हा काळ अवघे विचारा । पारखी ते करा साह्य येथें ॥

---

१ पोसावयाचें मूल, दत्तक. २ न्यायाची कचेरी. ३ झूल. ४ पाश. ५ जाळें. ६ दूर करणें, निरसन. ७ बाजार. ८ तोट्याचा. ९ माल.

शृंगारिलें दिसे न कळे अंतर। गोंविलें पदर उगवेना ॥
तुका म्हणे खोटें गुंफता विसारें। हातींचिया खरें हातीं घ्यावें ॥

## ४९६. खऱ्याची परीक्षा करून तें गांठीं बांधा.

सकळिकांच्या पायां माझी विनवणी। मस्तक चरणीं ठेवितसें ॥
अहो श्रोते वक्ते सकळही जन। बरें पारखून बांधा गांठीं।
फोडिलें भांडार धन्याचा हा माल। मी तंव हमाल भारवाही॥
तुका म्हणे चाली झाली चहूं देशीं। उतरला कसीं खरा माल ॥

## ४९७. आंधळ्यास मोत्याची किंमत काय ?

मृगाचिये अंगीं कस्तुरीचा वास। असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥
भाग्यवंत घेती वेंचूनियां मोल। भारवाही मेले वाहतां ओझें ॥
चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा। भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥
अधिकारी येथें घेती हातवटी। परीक्षवंतां दृष्टी रत्न जैसें ॥
तुका म्हणे काय आंधळियां हातीं। दिलें जैसें मोतीं वायां जाय॥

## ४९८. देव घेण्यास रुकामोल कांहीं लागत नाहीं.

देव घ्या कोणी। आइता आला घर पुसोनि ॥
देव न लगे देव न लगे। सांठवणाचे रुधले जागे ॥
देव मंदला देव मंदला। भाव बुडाला काय करूं ॥
देव घ्या फुका देव घ्या फुका। न लगे रुका मोल कांहीं ॥
दुबळा तुका भावहीन। उधारा देव घेतला ऋण ॥

---

१ गुंतलेला. २ एकाद्यास गुंतवून ठेवण्याकरतां आधीं पैसे देतात ते.

४९९. आपलें वर्म सांगूं नये; उगीच लोकांमध्यें भ्रम असूं द्यावा.

न सांगावें वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ॥
उगीच लागतील पाठी । होतीं रितींचे हिंपुटी ॥
शिकविल्या गोष्टी । शिकोन न धरिती पोटीं ॥
तुका म्हणे सीण । होइल अनुभवाविण ॥

५००. मनांत देवाचें चिंतन करणें हाच उत्तम शकुन.

अवघा तो शकुन । हृदयीं देवाचें चिंतन ॥
येथें नसतां वियोग । लाभा उणें काय मग ॥
छंद हरिच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥
तुका म्हणे हरिच्या दासां । शुभकाळ अवघ्या दिशा ॥

---

१ व्यर्थ. २ खिन्न.

# तुकारामवचनामृत

## अभंगसूचि

# TUKARAMA

## TABLE OF HEADINGS

### Part Ist: Tukarama's Mystical Career



### Part IInd: Tukarama's Mystical Teaching

## CHAPTER I.

### Historical Events in his life.

---

## CHAPTER II.

### Tukarama as Spiritual Aspirant.

PAGE.

## CHAPTER III.

### The Dark Night of Tukarama's Soul.

---

## CHAPTER IV.

### The Ecstatic and Post-Ecstatic experiences of Tukarama.

---

## CHAPTER V.

### Preparation for mystic life.

---

## CHAPTER VI.

### The Spiritual Teacher.



---

## CHAPTER VII.

### The Name.

PAGE.

## CHAPTER VIII.

### Kirtana.



---

## CHAPTER IX.

### Bhakti.



## CHAPTER X.

### Castes

---

## CHAPTER XI.

### The God of Pandharpur.

---

# CHAPTER XII.

## Theistic teaching about God.

---

# CHAPTER XIII.

## God's Office for the Saints.

---

## CHAPTER XIV.

### Characteristics of Saints.

---

## CHAPTER XV.

### The Identity of Saints with God.

PAGE.

## CHAPTER XVI.

### Tukarama's Pantheistic Teaching.



---

## CHAPTER XVII

### Doctrine of Mystical Experience.

---

## CHAPTER XVIII.

### Allegories.



---

## CHAPTER XIX.

### Worldly Wisdom.

